

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] ऑगस्ट १९६१ [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

[अनुक्रमणिका](#)

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें
अंक अकरावा

ऑगस्ट
१९६१

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९.

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : **डॉ. पी. एल्. वैद्य** एम्. ए., डी. लिट्. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

**मिळण्याचें ठिकाण —**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई** ( सातारा )

# सार-संकलन

## निःशस्त्रीकरणाच्या समस्येचे नवे पैलू

शास्त्रीय संशोधनाच्या पुण्याईनें सबंध मानवजातीचा विनाश घडवून आणण्याची कुवत असलेल्या अस्त्राचा शोध लागल्यावर हा संभाव्य विनाश टाळण्याकरितां काय उपाययोजना करावी, याची कंटाळा येण्याइतकी चर्चा सर्वत्र सुरू झाली आहे. अजूनहि हा भर ओसरण्याची शक्यता दिसत नाहीं. आणि नुकताच ह्या समस्येचा एक नवाच पैलू प्रकाशांत आला आहे. ह्या पैलूलाहि आणखी दोन बाजू आहेत. त्या दोन्ही बाजूंचे मुद्दे थोडक्यांत येथें देण्यांत आले आहेत.

Dissent च्या वसंत–अंकांत श्री. सेमूर मेल्मन यांनीं अध्यक्ष केनेडींना पाठवलेल्या एका निवेदनवजा मसुद्याचा पूर्वार्ध आला आहे. त्यांचें म्हणणें असें—

'शस्त्रास्त्रांच्या आंतरराष्ट्रीय शर्यतीबाबत एका नवीनच सिद्धांताचा शोध अमेरिकेंत लावण्यांत आला आहे. ह्या सिद्धांताचें एकमुखी नांव आहे ' शस्त्र -नियंत्रण '

' शस्त्रनियंत्रण ह्या शब्दाच्या नेहमींच्या अर्थावरून आपली अशी समजूत होईल, कीं हाहि एक शस्त्रसंन्यासाचाच प्रकार असावा, उत्तरोत्तर अधिक भयंकर रूप धारण करणाऱ्या शस्त्रास्त्रांच्या शर्यतीला उलटवण्याची ही राजकीय-तांत्रिक प्रक्रिया असावी. प्रत्यक्षांत मात्र जसजशी जगभर लोकांची शस्त्रसंन्यासाची इच्छा आणि आशा वाढत आहे, तसतसा शस्त्रसंन्यासाला पर्यायी उपाय म्हणून हा सिद्धांत तपशीलवारपणें पुढें ठेवला जात आहे.

' परस्परांशीं करारनामा करून रशियानें व अमेरिकेनें आपल्याजवळचीं महत्त्वाचीं अस्त्रें व इतर लष्करी सामग्री याबाबत तुल्यबल राहण्याचा प्रयत्न करावा, याकरितां आंखलेली योजना म्हणजे शस्त्रनियंत्रण. हिशेब असा कीं यामुळें परस्परांवर हल्ला करण्यास कोणी धजणार नाहींत व अशा प्रकारें ' stabilized deterrence ' ची अवस्था येईल.

' शस्त्र-नियंत्रण म्हणजे बॉंबच्या सान्निध्यांत कसें जगावें ' याची योजना आहे, व स्वतःला व्यवहारी वास्तववाद म्हणवणाऱ्या सिद्धांताला अगदीं अलीकडील फुटलेला हा फाटा आहे. वास्तविक पहातां हा व्यवहारी वास्तववादच मुळीं खोटा आहे. त्यानें फक्त अमेरिकन समाजाच्या रोगट स्थितीचें आत्यंतिक पराजयवादी भाकित तेवढें केलें आहे. शस्त्रसंन्यासाच्या धोरणानें ' अमेरिका उघडी पडेल ' अशी भीति अनेकांना वाटते. पाश्चिमात्यांच्या राजकीय कुवतीचा लष्करी मातब्बरांनीं बांधलेला हा अंदाज अतिशय निराशाजनक आहे.

' राजकीय व आर्थिक उपायांनीं सोव्हिएट पद्धतीला आवाहन देऊं शकेल अशी राजकीय प्रणाली व इच्छाबळ जवळ नसल्यानें, अनेक अमेरिकन मातब्बरांना निराशेनें गांजलें आहे. आशिया, आफ्रिका व दक्षिण अमेरिका या खंडांतील रशियाच्या राजकीय योजनांना कशा प्रकारें धरबंध घालावा, याबाबत अमेरिकेंतील एकाहि राजकीय व लष्करी विवेचकाजवळ एखादा सुसंगत दृष्टिकोन नाहीं. आणि सर्वमान्य राजकीय पद्धती जर ह्यांच्या कामीं येणार नसतील तर, सोव्हिएट प्रणालीच्या वाढीला लष्करी साधनांनींच तोंड दिलें पाहिजे, असें त्यांना वाटत असलें पाहिजे.

' औद्योगिक समाजरचनेच्या दोन प्रमुख राजकीय पर्यायांतच शस्त्र संन्यास व शस्त्र नियंत्रण वा दुसरी एखादी लष्करी योजना या बाबतचा राजकीय पक्षपात अंतर्भूत आहे.

' मुळांतच ठामपणें राजकारणाशीं संबंधित नसलेल्या किंवा लोकशाही पद्धतीविरुद्ध पूर्वग्रह असलेल्यांना असल्या पर्यायांचें आकलनच होत नाहीं. त्यामुळें सोव्हिएट पद्धतीला लोकशाही पर्याय सुचवणें त्यांना आतांपर्यंत शक्य झालें नाहीं. अनेक स्तरांवर निर्णय घेतला जाऊं शकतो, हा लोकशाही मार्गाचा एक विशेष आहे. औद्योगिक जीवनांत याचा अर्थ असा होतो, कीं चालक व सरकार यांपासून वेगळी व चालक मंडळींच्या निर्णयाला समांतर परंतु स्वतःचे असे निर्णय घेऊं शकणाऱ्या स्वतंत्र संघटना बनवण्याचा कामगारांना हक्क आहे.








अबाढव्य औद्योगिक धंद्याची चालक-मंडळीच जेव्हां अशा संघटनेच्या प्रक्रियेला मर्यादा घालण्यांत व तिचें समूळ उच्चाटन करण्यांत सहभागी होतात, तेव्हां कामगारांच्या स्वतंत्र संघटना बनवण्याच्या तत्त्वामागील राजकीय सिद्धांताला पाठिंबा देणें त्यांना शक्य नसतें. कामगारांच्या स्वतंत्र संघटना व त्यामुळें आर्थिक जीवनांत वेगवेगळ्या स्तरांवर घेतले जाणारे निर्णय हा आपल्या सामर्थ्याला एक धोका आहे असें अमेरिकेंतील सनातनी प्रवृत्तीच्या चालकमंडळींना वाटत असल्यानें, रशियांतील एकाच स्तरावर सर्व निर्णय घेतले जाण्याच्या योजनेला आपल्याकडे तोड आहे, व आपली योजना ही अधिक काम्य आहे, असा प्रस्ताव करणें त्यांना अशक्य आहे. नव्याने उदय पावलेल्या राष्ट्रांकरितां ही गोष्ट अतिशय महत्त्वाची आहे. तेथें आर्थिक विकास प्रामुख्यानें सरकारी प्रेरणेनेंच घडून येणार, व असे निर्णय घेण्याकरितां सरकार कसें कामीं लावावें, याबाबतचा सिद्धांत रशियाजवळ आहे : सत्ताधिष्ठित व एकस्तरी उपाय आवश्यक व अटळ असतात, असें त्यांचें म्हणणें आहे. सरकारी प्रेरणा संपूर्णतः समाधानकारक असते, हा प्रस्ताव आतां लोकशाही पर्यायांत अंतर्भूत करून घेतला पाहिजे; परंतु त्याचवेळीं निर्णायक असे वेगवेगळे स्तर अस्तित्वांत असणें, स्वतंत्र संघटना बनवण्याचा हक्क असणें, यांत व समाजरचनेंत आणि इतर लोकशाही पद्धत यांमुळें या दोन पर्यायांत खूपच फरक पडतो, हें विशद केलें पाहिजे. अशी परिस्थिति हा राजकीय लोकशाहीचा पाया आहे.

'परंतु ह्या परिस्थितीचा प्रस्ताव बाहेरदेशीं मांडण्यापूर्वी अमेरिकन लोकांना त्याचें राजकीय महत्त्व आकलन झालें पाहिजे, व आपल्या मायदेशीं ह्या परिस्थितीचें स्वागत करण्याची त्यांची तयारी असली पाहिजे.

'निव्वळ एवढेंहि करण्याची क्षमता नसल्यानें, सोव्हिएट पद्धतीशीं राजकीय व आर्थिक सामना देण्याचें बळ अमेरिकन पुराणमतवाद्यांत नाहीं. ह्या राजकीय अपमानाची भरपाई करण्याचा प्रयत्न ते केवळ लष्करी सत्तेवर भर देऊन करत असतात. वास्तविक पहातां, लष्करी वास्तववादाच्या नांवानें मिरवणारी चीज ही प्रत्यक्षतः लोकशाही समाजाच्या टिकूं शकण्याच्या कुवतीचा अंदाज बांधण्यांत पदरीं पडलेली राजकीय निष्फळता आहे.

'तिसरें महायुद्ध झाल्यास किती लक्ष लोक प्राणास मुकतील, याची रँड कॉर्पोरेशननें तयार केलेली आंकडेवारी हा लष्करी योजनांवर प्रमुख भर दिल्याचा सोव्हिएट पद्धतीशीं मुकाबला राजकीय मार्गांनींहि करतां येईल यावर विश्वास नसल्याचा परिपाक आहे.

'नियंत्रित शस्त्रसंन्यासाला विरोध असलेल्या ह्या मंडळींजवळ लहान देशांना व चीनला अणु-अस्त्रें उपलब्ध होऊं नयेत, याकरितां कांहींच योजना नाहींत.

'शस्त्रास्त्रांच्या शर्यतीच्या ह्या पाठीराख्यांच्या उपदेशांत आतां तिसऱ्या महायुद्धाचा व सार्वत्रिक आत्महत्येचा अंतर्भाव करण्यांत आला आहे.

शस्त्रास्त्रांच्या शर्यतीवर सारखा असा भर देत राहण्यांतील मुख्य तोटा म्हणजे त्यामुळें शेवटीं आपण युद्धाकडेच फरफटत नेले जाऊं, व आणखी शिवाय सोव्हिएट पद्धतींतील ज्या सर्वंकषतेबाबत आपला प्रमुख आक्षेप आहे, तीच नकळत आपलें लक्ष्य होऊन बसते.

'लष्करी तयारीकरितां बहुसंख्य उत्पादन कामीं येत असल्यामुळें जगाच्या आर्थिक विकासाच्या प्रचंड कार्यास हातभार लावून सोव्हिएट पद्धतीस आडकाठी करण्यांत असमर्थता पदरीं येते.

'सामान्यतः युद्धानें राजकीय उद्दिष्टांची बटिकगिरी केली आहे. परंतु शस्त्र-नियंत्रणासारख्या लष्करी योजनांमुळें सोव्हिएट पद्धतीच्या वाढीस आळा घातला जाण्याची शक्यता आज तरी दिसत नाहीं, व कधीं-काळीं का होईना तसें होऊं शकेल अशीं लक्षणेंहि आज दिसत नाहींत. लष्करी कोंडी ही राजकीय कोंडी असतेच असें नव्हे. एकच एक विजयी समाजपद्धतीशिवाय लष्करी विजयाला कांहींच राजकीय अर्थ असणार नाहीं, खरें म्हणजे त्याला कांहींच अर्थ असणार नाहीं.

'अमेरिकन समाज गुलामगिरींत राहण्यापेक्षां तो नष्ट झाला तरी चालेल, हा ह्या लष्करवादी लोकांचा अंतिम विचार. हा प्रस्ताव सबंध समाजाला लागूं केला, तर ह्यांच्या वास्तववादांतील पोकळपणा व सामाजिक आत्महत्या ध्यानीं येईल.



अनुक्रमणिका







## सार-संकलन

'शस्त्रसंन्यासाला विरोध करण्यांतील त्यांचा ताठरपणा हा राजकीय व आर्थिक लोकशाहीच्या दुबळेपणावरील त्यांच्या विश्वासाचा ताठरपणा आहे.'

Dissent च्या त्याच अंकांतील The Insanity of Realism ह्या लेखांत श्री. रॉबर्ट पी. वोल्फ् असें प्रतिपादन करतात —

'स्वतःला स्वतःच वास्तववादी म्हणवणाऱ्या व इतरांकडून तसेंच म्हणवून घेणाऱ्या एका राजकीय पंथाच्या लोकांवर आतांपर्यंत इतिहासाची कृपादृष्टि होती. चर्चिलच्या रचनांतून भरपूर उसनवारी करून स्वतःला निःपक्षपाती, निःस्पृह आणि 'अगणित गुंतागुंत' असलेल्या आंतर–राष्ट्रीय समस्यांचे सूज्ञ अभ्यासू म्हणवून घेण्याजोगी शैली त्यांनीं प्रचारांत आणली.

'पूर्वतयारीच्या ह्या कांहीं वर्षांत आपला जम बसल्यासारखें त्यांना वाटतें न वाटतें तोंच इतिहासानें ह्या वास्तववाद्यांना चकवलें. पूर्वी तोंड दिलेल्या कोणत्याहि समस्येपेक्षां सर्वस्वी वेगळी समस्या इतिहासानें जागतिक रंगभूमीवर आणून सोडली. ह्या सर्व विद्वानांनीं अनेक वर्षे खपून सांठवलेलें ज्ञान निरुपयोगी करून टाकणाऱ्या ह्या समस्येचें नांव आहे– शस्त्रसंन्यास.

'शस्त्रसंन्यासावरील नव्या लिखाणांतील वाक्यप्रयोगांतून ह्या समस्येचें नूतनत्व स्पष्ट दिसतें : युद्ध हें आतां राजकीय धोरणाला आकार देणारें हत्यार उरलेलें नाहीं; शस्त्रास्त्रें हीं राष्ट्राराष्ट्रांतील ताणाचीं निदर्शक नसून कारण आहेत; तंत्रविद्येंतील अनंत क्रांति सर्वच लष्करी योजना तत्क्षणींच निरुपयोगी करून टाकते; आतां आपण एकतर एकत्र जगावें किंवा एकत्रच मरावें– यापेक्षां वेगळा पर्याय आपल्यासमोर नाहीं.

'राजकीय वास्तववाद्यांचें प्रमुख भांडवल म्हणजे त्यांची दूरदृष्टि-भूतकाळाकडे प्रसारित झालेली दिव्यदृष्टि. परंतु एकोणिसाव्या शतकांत अण्वस्त्रांवर वाटाघाटी झाल्याचा इतिहास दुर्दैवानें ह्या वास्तववाद्यांना उपलब्ध नाहीं. पूर्वीच्या परिषदांतून रक्त आटवून शिकलेलीं तत्त्वें निव्वळ निरुपयोगीच नव्हेत, तर ती एक प्रचंड जबाबदारी आहे. 'युद्ध नेहमींच आपल्या बाजूनें असतें व आपल्या धोरणाचें एक हत्यार म्हणून आपण त्याचा वापर केला पाहिजे'—असें वास्तववादी शिकला आहे. आणि शास्त्रज्ञांकडून जास्तीत जास्त एवढाच दिलासा मिळूं शकतो, कीं आपण फारतर आणखी एक युद्ध निभावून नेऊं शकूं. त्यानंतर परत आणखी एका युद्धाची कल्पना वास्तववादी मनुष्यहि करूं शकणार नाहीं. जगांत बदल होऊन तें न ओळखतां येण्याजोगें झालें आहे, आणि जगाकडे पूर्वीच्याच नजरेनें पाहणारा वास्तववादी हा एकदम अ-वास्तववादी बनला आहे. त्याचें ज्ञान आतां निरुपयोगी ठरलें असल्यानें तो आपली एकुलती एक ठेव तेवढी जिवापाड जपत आहे – आपली खोटी भूमिका. तो आतां शहाणा उरला नसला, तरी अजून तो शहाणा दिसूं शकतो, 'गुंतागुंतीची जाणीव करून घ्या' अशा विनवण्या करणें अजून त्याच्या हातांत आहे.

'परंतु ह्या समस्येंत वास्तववादी मनुष्य कोणती कड घेतो, हा प्रश्न उरतोच. वास्तववाद्यांनीं नव्या भविष्यवादी माणसांची बाजू घेतली आहे. Stabilized deterrence हा त्यांचा ह्या अपूर्व समस्येवरील तोडगा आहे.

त्यांच्या सिद्धांतानुसार शांततेला प्रमुख धोका आधुनिक शस्त्रपद्धतीच्या अस्थिरतेमुळें आलेला आहे. प्रतिक्रियात्मक उत्तर देण्याकरितां आपल्या संरक्षण-योजनेला उपलब्ध असलेली मुदत उत्तरोत्तर संकोच पावत आहे, व त्यामुळें सूक्ष्मांत सूक्ष्म प्रतिक्रिया व विखुरलेली सत्ता ह्या गोष्टी अटळ झाल्या आहेत. राडारवर येणारे न ओळखूं येणारे आवाज हे शत्रूच्या missiles चे आहेत किंवा काय याचा निर्णय पाव-अर्ध्या क्षणांत घेणें आवश्यक झालें आहे. स्वतःला बळकटी देणारें भाकित करणें किंवा आपल्यावर हल्ला झाला आहे, अशा खोट्या कल्पनेनें आपण ज्याची आत्यंतिक भीति बाळगून आहोंत तें शत्रूच्या अस्त्रांचें मोहोळ उठवणें हेंहि शक्य–कोटींतील झालें आहे. निर्णय घेण्याची फारशी कुवत नसलेला एखादा वैमानिक दलाचा कप्तान किंवा अणु–पाणबुडीवरचा वेड लागलेला एखादा अधिकारी–कोणीहि हा अग्निप्रलय सुरू करूं शकतो.

'परस्परांचा विनाश घडवून आणण्याचा परस्परांच्या कुवतीला ढका न लावतां भीतीच्या ह्या तराजूचीं








दोन्हीं पारडीं स्थिर ठेवण्याकरितां प्रयत्न करणें– हें वास्तववाद्यांचें उत्तर. अपघाताची-युद्धाची संभाव्यता टाळून शिवाय ह्या शस्त्रास्त्रांमुळें आपल्या धोरणाचा पाया म्हणून असलेली आपली लष्करी शक्ति अबाधित राहील. राजकीय वास्तववाद्याला मोह पाडणारी वस्तू येथें लपलेली आहे : कांहीं तांत्रिक जुळवाजुळव करून व संरक्षक उपाय योजून विनाशाची धमकी काढून टाकली म्हणजे मग आंतरराष्ट्रीय राजकारणाचें गाडें पूर्ववत् चालूं शकेल. जग जसें आहे तसें तें पहाणें व तें जेव्हां बदलेल तेव्हां आपण त्याच्याशीं जुळतें घेणें-हीं शहाण्या माणसाची लक्षणें झालीं. उलटपक्षीं माथेफिरू माणूस विरोधी वस्तुस्थितीचें अस्तित्वच अमान्य करीत व आपल्या मनांतील परिस्थितीची मूर्ति भंगूं न देण्याकरितां उत्तरोत्तर अधिकाधिक असंभाव्य अटी लादीत आपल्या जुन्याच सुखदायक समजुतींना कवटाळून बसतो. आपल्या तंत्रविद्येंत घडून आलेली अपूर्व क्रांति लक्षांत घेतां पूर्वीचे कोणतेच उपाय आतां आत्मरक्षणार्थ उपयोगी पडण्याजोगे नाहींत. दर चार-पांच वर्षांनीं शस्त्रास्त्रांची नवीनच श्रेणी व्यवहारांत येईल, असेंहि आतां निश्चितपणें सांगतां येतें. आणि जन्मास येणारी नवी श्रेणी जुन्या सर्व श्रेणींना निरुपयोगी करून टाकते. असें असूनहि १९७० सालापर्यंत आपल्या जीवन पद्धतींत काय-काय बदल घडून येणें शक्य आहे, याचा हिशेब करण्याकरितां हे वास्तववादी विद्वान दूरदृष्टीनें गणितें मांडतात. १९८० साल आपल्याला दिसेल कीं नाहीं, याची नुसती शक्यताहि कोणी विचारांत घेण्यास तयार नाहीं. '

त्याच अंकांतील ह्या विषयावरील आणखी एका लेखांत श्री. स्टीफन् थर्नस्ट्रॉम् यांनीं मॅसॅच्युसेट्स् येथील योजनेबाबत विचार व्यक्त केले आहेत --

' युद्ध व शांतता-काळांत ' स्वतंत्र सरकार टिकवण्याकरितां ' मॅसॅच्युसेट्स्च्या राज्यानें भूमिगत होण्याचें ठरवलें आहे. अमेरिकेंतील पहिलें भूमिगत आश्रयस्थान बांधण्याची योजना संमत करून तेथील विधिकर्त्यांनीं अणुयुगाचे अग्रदूत होण्याचा निर्धार केला आहे.

' १९५५ सालीं प्रथम ही योजना जन्मास घातली गेली. त्यावेळीं कमाल घाई, किमान चर्चा व थोडका विचार करण्यांत आला. दहा लक्ष एकोणसत्तर डॉलरांचें वर्षासन त्याकरितां मंजूर करण्यांत आलें. परंतु नेहमींप्रमाणेंच सरकारचीं चाकें अत्यंत मंद गतीनें हललीं. प्रत्यक्ष बांधकामाच्या बोलण्याला आरंभ होण्याकरितां १९६१ च्या फेब्रुवारीची १५ तारीख उजाडावी लागली. आतां ह्या वसंत ऋतूंत खणण्याला सुरुवात होणार आहे आणि हें अविनाशी आश्रयस्थान ' थोडक्या महिन्यांच्या काळांतच ' तयार होणार आहे. ह्या आश्रयस्थानांत तीनशें माणसांची सोय होणार आहे. आणि हे निवडक तीनशे लोक कोण असणार आहेत ? तर ' राज्य-सरकारच्या तीन खात्यांचे कार्यकारी प्रतिनिधि ' आणि राज्य-सरकारचें सबंध नागरी संरक्षण खातें.

' ह्या आश्रयस्थानाची जागा - फ्रॅमिंगहॅम - बीकन हिलच्या स्टेट हाउसपासून वीस मैल अंतरावर आहे. गर्दी विरळ असतांना मोटारीनें तेथें पोंचण्यास अर्धा तास लागतो. परंतु धोक्याचा भोंगा वाजल्यावर सर्वच लोक रस्त्यावरून पळूं लागतील व हें वीस मैलांचें अंतरच दोनशें मैलांसारखें वाटेल. फ्रॅमिंगहॅमची ही जागा तंत्रविद्येच्या अपरिपक्व काळांत - जेव्हां सूचनेचा काळ तासांत मोजला जात असे - पक्की केली होती, परंतु सध्यांच्या I. C. B. M. युगांत हा काळ मिनिटांतच मोजावा लागेल. तेव्हां त्या दृष्टीनेंहि त्याची उपयुक्तता किती असेल याची कल्पना येईल.

'मॅसॅच्युसेट्स्च्या निवडून आलेल्या प्रतिनिधींनीं एक कामगिरी मात्र बजावली : त्यांनीं हें गुपित आपल्या मतदारांत फोडलें नाहीं. ८ फेब्रुवारी रोजीं बोस्टन SANE तर्फे नव्वद लोकांचा आश्रयस्थानविरोधी मोर्चा स्टेट हाउसवर गेला. दुसऱ्या मोर्चांत १३५ लोक सामील झाले. वृत्तपत्रांत, आकाशवाणीवर व टेलिव्हिजनवर ह्या प्रकरणाला चांगली प्रसिद्धि मिळाली. आश्रय - योजनेवर टीका करणाऱ्या तपशीलवार पुस्तिका विधिमंडळाच्या प्रत्येक सभासदाला SANE कडून पाठवण्यांत आल्या. आणि एक दुरुस्ती-विधेयक विधि-मंडळांत मांडण्यांत आलें.

' ह्या सर्व प्रकरणांत कदाचित् वेळ टळून गेली असेल. लोकशाही जडत्वाचा एखादा लोखंडी कायदा कार्यकारी असेल - एक अफाट खर्चाची योजना सुरू











होण्यास जर सहा वर्षे लागत असतील, तर ती थांबवण्याकरितां आणखी सहा वर्षे लागणें शक्य आहे. परंतु स्टेट हाउसपासून फ्रॅमिंगॅहम पर्यंतचें अंतर काटायला लागणाऱ्या वेळाच्या प्रश्नावर तोडगा सुचवण्यांत आला. स्टेट हाउसजवळ कांहीं हेलिकॉप्टर्स ठेवलीं म्हणजे झालें. पण परत संख्येचा प्रश्न सतावूं लागतोच. हे तीनशे लोक कोण असतील ? त्यांची निवड कोण करणार ? बाहेर असणाऱ्या लक्षावधि लोकांचें काय ? कदाचित् ह्या स्वतंत्रतेच्या देशांतली शेवटची लोकशाही मागणी ' आम्हांला आंत यायचें आहे ' अशी असेल.

' ह्या आश्रयस्थानाचें कागदोपत्री नांव ' State Control Centre and Alternate site of State Government ' असें आहे. ह्यामुळें एक गोष्ट आपोआप लपवली गेली आहे. ती अशी कीं ह्या पर्यायी जागेवरील सरकार हें संपूर्णतः नवें–नागरी संरक्षण अधिकाऱ्यांचें लष्करी–सरकार असेल. नागरी संरक्षण खात्याचे चौतीस अधिकारी आपले कामाचे दिवस ह्या आश्रयाखालीं व्यतीत करतील, व आंत प्रवेश मिळविण्यांत यशस्वी झालेल्या दुसऱ्या कोणालाहि प्रत्यक्ष निर्णय घेण्यांत हात घालतां येणार नाहीं. यामुळें निदान विधिमंडळाच्या सदस्यांना तरी धक्का बसावा. उरलेल्या लोकांचा कांहीं प्रश्नच नाहीं, कारण ते मेलेलेच असतील. आणि तसें पाहिलें तर कोणीं सांगावें हे आंतले लोकहि मेलेलेच असतील. कारण ह्या आश्रयांत प्राणवायूचा पुरवठा करणारीं व आंत गारवा राखणारीं कांहींच साधनें नाहींत. पण जाऊं दे, त्याची काळजी कोण करीत बसतो ? शस्त्र-संन्यासाला बगल देऊन सर्वनाशावर हर्मन काननें सुचवलेला तोडगा चुकीचा असला, तरी त्यानें टाकलेला प्रश्न मात्र अचूक आहेः will the survivors envy the dead ?

स्वतःला SANE म्हणवणाऱ्या लोकांची ही बाजू. आतां स्वतःला REALIST म्हणवणाऱ्या व ह्या SANE च्या विरोधी भूमिका घेणाऱ्या लोकांची बाजू श्री. सिडने हूक यांनीं New Leader साप्ताहिकाच्या २४ एप्रिलच्या अंकांत मांडली आहे, तिचा हा सारांश–

' मानसिक पृथक्करण करणारें बरेंचसें लिखाण, विशेषतः त्या विषयावरील टीकेला उत्तर म्हणून केलेलें लिखाण, हें म्हणजे एक तपशीलवार argumentum ad hominem असतें : टीकाकारानें मांडलेल्या मुद्द्यांचा खल करण्याऐवजीं टीकाकारांच्या संरक्षक यंत्रणेबद्दलची बडबडच ह्या लिखाणांत असते. म्हणजे तर्कसंगत विधानाऐवजीं त्यांत वैयक्तिक कुरापतींना स्थान दिलें जातें.

' ह्याहि पेक्षां अधिक शोचनीय घटना आतां परराष्ट्रीय धोरण, शस्त्रनियंत्रण व साम्यवाद या गुंतागुंतीच्या क्षेत्रांतील विशिष्ट दृष्टिकोनांचे कडवे पक्षपाती बनलेल्या कांहीं मनःपृथक्करण करणाऱ्या शास्त्र्यांच्या लिखाणांतून आढळून येत आहे. आपल्याशीं मतभेद असणाऱ्यांचीं विधानें व त्यांच्याजवळचा पुरावा यांच्याशीं सामना देण्याऐवजीं विरोधकांचें डोकें ठिकाणावर आहे काय असें आवाहन देऊन ते तंटा मिटवूं पहात आहेत.

' कांहीं दिवसांपूर्वींच्या न्यूयॉर्क टाइम्समध्यें डॉ. एरिक् फ्रॉम् यांच्या नांवें Committee for a Sane Nuclear Policy ची एक जाहिरात आली होती. मानसिक आरोग्यावरील प्रवचनाच्या बुरख्याखालीं ह्या समितीपेक्षां वेगळी भूमिका घेणाऱ्यांना रशियाच्या दुष्ट हेतूंच्या संदर्भात paranoia व obsessional neurosis झाला आहे असें त्यांत प्रतिपादन करण्यांत आलें होतें. संभाव्यतेपेक्षां ( probabilities ) शक्यतांची ( possibilities ) काळजी वहाणें, हा paranoid विचारसरणीचा विशेष म्हणून त्यांत सांगण्यांत आला होता. आणि रशियाच्या उद्दिष्टांबद्दल साम्यवादाच्या टीकाकारांना फार काळापासून वाटत आलेल्या अस्वस्थतेचें मूळ ह्या जाहिरातीनें थेट त्यांच्या स्वतःच्या दुष्ट स्वरूपाच्या साम्यवादावर केलेल्या pathological आरोपणापर्यंत नेऊन भिडवलें होतें. साम्यवाद म्हणजे सर्व वाईट गोष्टींचा अवतार. थोडक्यांत म्हणजे ही सर्व एक सैतानाची उलटी पूजा आहे. अशाच प्रकारच्या विधानांची जडणघडण आतां आत्तांपर्यंत साम्यवाद व आंतरराष्ट्रीय घडामोडींत विशेष रस वा त्यांचें ज्ञान न दाखविणाऱ्या व्यक्तींच्या लिखाणांतून आढळून येत








आहे. Scientific American च्या मार्चच्या अंकांत जेम्स न्यूमन यांनीं हर्मन् कानवर केलेल्या बीभत्स वैयक्तिक चिखल फेकींतहि मूलतः एरिक् फ्रॉमच्या विधानांची मूळ दिशाच अनुसरली गेली आहे.

'एक गोष्ट आहे. एक माणूस एका मनःपृथक्करण शास्त्र्याकडे गेला आणि त्यानें त्याला विचारलें, 'डॉक्टर, एखाद्याला जर अशी भावना झाली कीं आपल्याला वाईट वागणूक दिली जात आहे–अन् तें जर खरंच असलं-तर ह्या मनोगंडाला तुम्ही काय म्हणाल ?' आतां मनःपृथक्करण जर Christian Science हून कांहीं वेगळें असेल, तर वाईट रीतीनें वागवल्या जाण्यासारख्या वाईट गोष्टी जगांत घडतात, हें फ्रॉमना कबूल करावेंच लागेल. आतां आपल्याला वाईट वागणूक दिली जात असे असें प्रामाणिकपणें वाटणें आणि असा निव्वळ मनोगंड असणें ह्यांत फरक काय ? अर्थात् अशा वाटण्यावर आधारलेल्या सुसंबद्ध तर्कांना जर प्रत्यक्षतः पुष्टि मिळते काय हा प्रश्न आहे; आणि हे तर्क निव्वळ आपल्याला वाईट रीतीनें वागवलें जात आहे अशी शंका बाळगणाऱ्या माणसाच्या वागणुकीवर आधारलेले असून चालणार नाही-कारण त्याच्या वागणुकीनें त्याला भीति वाटणाऱ्या गोष्टी मूर्त होण्याची साधार शक्यता आहे,-तेव्हां हे तर्क आधारलेले असतील, आपल्याला ज्यांच्याकडून वाईट वागवलें जात असे असा त्याला संशय आहे त्यांच्या वागणुकीवर.

'आतां असें समजा, कीं एकाच्या बाबतींत आपला अंदाज खरा ठरला – आणि संशयग्रस्त इसमानेंच ही वाईट वागणूक स्वतःवर ओढवून घेतलेली नाहीं, हें स्पष्ट झालें. अर्थात् केवळ एवढ्याचमुळें कांहीं आपल्या दाव्याचा खरेपणा सिद्ध होणार नाहीं. डॉ. फ्रॉम् नक्कीच सांगतील, कीं हा केवळ एक दुर्दैवी योगायोग असण्याची शक्यता आहे. मग दुसरी एक अशीच 'केस' तपासली व तेथेंहि आपल्या संशयाला दुजोरा मिळाला. हाहि योगायोगच असेल का ? मग आणखी अनेक 'केसीस्' अशाच घेतल्या, आणि सर्वच बाबतींत वेगवेगळ्या लोकांकडून आपल्या संशयाला बळकटी आणली गेली. अर्थात् 'केसीस'ची ही लांबड आणखी कितीहि लांबवली, तरी अत्यंत तर्कशुद्धपणें आपल्याला हें म्हणणें कधींच धुडकावून लावतां यायचें नाहीं, कीं ह्या सर्व दुर्दैवी घटना एक संकटमालिका असण्याचीच शक्यता आहे. मग 'तुमचेंच कांहींतरी चुकलें असेल' असें म्हणणें सोडून 'तुमचें बरोबर असण्याची शक्यता आहे' अशी कबुली डॉ. फ्रॉम् केव्हां देतील ? आपल्या मनोगंडानें पछाडलें नव्हतें, आपले खरोखरीच हाल करण्यांत येत होते हें उमगण्याकरितां तो माणूस शत्रूकडून ठार मारला जाण्याची वाट पहात डॉ. फ्रॉम थांबतील काय ? अर्थात् इतका काळ थांबण्याचा धीर त्यांना झाला तर मग "आपला 'पेशंट' चुकून मारला गेला" यावर विश्वास ते ठेवूं शकतील.

'आतां ह्या छोट्याशा गोष्टीचें तर्कशास्त्र साम्यवादाला व साम्यवादी पुढाऱ्याच्या विश्वसनीयतेला बरोबर लागूं पडतें, परंतु ह्या तर्कशास्त्राचा वापर करण्यांत डॉ. फ्रॉम् चुकतात. आतां क्रेमिनच्या शब्दावर विश्वास टाकणें ज्यांना शहाणपणाचें वाटत नाहीं आणि दुसऱ्याला समजूं येईल अशा ठिकाणींच फक्त अणुचांचणीवर बंदी घालावी अशी मागणी जे करीत आहेत, ते आपली भूमिका 'साम्यवादी आपला शब्द कदाचित् पाळणार नाहींत' या **शक्यतेवर** आधारत नसून, 'साम्यवादी आपला शब्द पाळणार नाहींत' ह्या **संभाव्यतेवर** आधारत आहेत. संभाव्यतेचा हा निष्कर्ष (१) ऐतिहासिक पुराव्यावरून, (२) साम्यवाद्यांच्या डावपेंचांच्या तत्त्वांवरून आणि (३) त्यांच्या राजकीय तत्त्वप्रणाली व ध्येयांवरून काढलेला आहे

ही विचारधारा थोडक्यांत अशी आहे – वीस किलोटनापेक्षां कमी गुरुत्वाच्या भूमिगत चांचण्यावरील बंदी मोडली तरी आतां उपलब्ध असलेल्या उपायांनीं त्यांचा पत्ता लागणें शक्य नाहीं. आपली संरक्षण योजना सुधारण्याकरितां अण्वस्त्रांची चांचणी करणें अनिवार्य आहे. सध्यां आपल्या हातीं असलेल्या अण्वस्त्रांचा deterrent परिणाम क्रेम्लिननें तंत्रशास्त्रांत अधिक प्रगति केल्यास शून्य होऊन जाईल. ह्या दिशेनें आपले प्रयोग चालू असल्याचें क्रेम्लिनच्या प्रवक्त्यांनीं सूचित केलें आहे व अचानक हल्ल्याच्या शक्यतेबद्दल उघड चर्चा केली आहे.



अनुक्रमणिका






ह्यांत जर त्यांना यश आलें, तर त्यांचें लष्करी वर्चस्व एवढें वाढेल कीं स्वतः सुरक्षित राहून ते आपल्यासमोर फक्त दोन पर्याय टाकतील-विनाश किंवा शरणागति. स्वतः सुरक्षित राहून एखादा सर्वमान्य रिवाज मोडतां आला, तर तो मोडण्यास साम्यवादी कचरणार नाहींत अशी संभाव्यता-त्यांच्या तत्त्वप्रणालीवरून व इतिहासावरून-आहे. पश्चिमी राष्ट्रांनीं एखादा तह मोडला तर तें लगेच कळूं शकतें-कारण तेथें स्वतंत्र जनमत अस्तित्वांत आहे. साम्यवादी जगांत असें कांहीं स्वतंत्र जनमतच नाहीं. क्रेम्लिन मनांस येईल त्याप्रमाणें वागूं शकतें. आणि येथें लावलेला पण-आपलें स्वातंत्र्य-इतका प्रचंड आहे, कीं क्रेम्लिनच्या शब्दावर विसंबून आपलें अस्तित्वच धोक्यांत आणणें शहाणपणाचें होणार नाहीं.

'विचारधारेंतील प्रत्येक पायरीगणिक आक्षेप घेतां येतील- परंतु ते आक्षेप सुसंबद्ध तर्कावर व योग्य त्या पुराव्यावर आधारलेले असले पाहिजेत, त्यांत मनःपृथक्करणाच्या भाकडकथांचा आसरा नसला पाहिजे.'

## विचारांचे घाट : कांहीं टिपणें

न्यूयॉर्कहून प्रसिद्ध होणाऱ्या Main Trends in Modern Thought या नियतकालिकाच्या मार्च-एप्रिलच्या अंकांत श्री. C. Gattegno यांचा एक अत्यंत उद्बोधक लेख आला आहे. त्याचा सारांश असा—

'विचार-प्रक्रियेचें (विचार ही एक क्रिया या अर्थानें) स्वरूप आपल्याला अद्याप फार थोडकें ज्ञान आहे. लोक विचार करतात आणि परिणामतः नव्या कल्पना, नवीं दर्शनें, नवे सिद्धांत उपलब्ध होतात. परंतु हीं सर्व येतात कोठून व त्यांचा विकास होतो कसा याबद्दल जवळजवळ सर्वच जण अंधारांत आहेत. सामान्यतः सामान्य माणसाला मौलिक विचार करण्याची संधी क्वचितच लाभते. परंतु तरी मानसिक इमले आणि मानसिक आचार तयार करण्याची क्षमता त्यांत असते, त्यामुळें त्याला समाधानकारक निष्कर्ष काढतां येतात व आपली विचारक्रिया कार्यकारी आहे याबद्दल त्याला विश्वास वाटतो. या पद्धतीला 'नमुन्या प्रमाणें विचार करणें' असें नांव देतां येईल, कारण त्यांत बहुसंख्य माणसांच्या अंगवळणीं पडलेले परंपरागत साचे अवलंबले जातात. अशा रीतीनें आपल्या रोजच्या अनुभवांतील परिस्थितिजन्य घटक व बौद्धिक प्रक्रियांचा अवलंब करून एखादा माणूस एखादी धंद्यांतील समस्या यशस्वीरीत्या सोडवूं शकेल. म्हणजे आपल्याला असें म्हणतां येईल, कीं अनोळखी गोष्टींना कवळणाऱ्या किंवा ओळखीचें जें-कांहीं त्याचा धुव्वा उडवून नवीं क्षितिजें उघडीं करणाऱ्या मौलिक विचाराखेरीज परंपरागत विचाराची पार्श्वभूमि म्हणून उभे राहणारे विचाराचे घाट असतात.

'विचारांचे वेगवेगळे घाट म्हणजे एकाच भाषेनें घेतलेलीं वेगवेगळीं रूपें होत, असें ढोबळपणें म्हणतां येईल. आतां भाषा मर्यादित आहेत हें सर्वांनाच माहित आहे; विचारांच्या व भावनांच्या हरेक तऱ्हा कोणतीहि एक भाषा अभिव्यक्त करूं शकत नाहीं. ह्याचमुळें बऱ्याच वेळां भाषांतर कर्त्यांच्या पकडींतून अर्थ निसटतो, कारण लेखकानें शब्दांमार्फत व्यक्त करण्याचा प्रयत्न केलेल्या गाढ अनुभवापासून आरंभ करण्याऐवजीं ते त्या लिखाणांतलि पूर्वगृहित आशयापासून आरंभ करतात. म्हणजे भाषा ह्या विचाराचें वाहन आणि गाळणी अशा दोन प्रकारें कार्य करते.

'यावरून अशी कल्पना होईल, कीं सर्व लोक जर एकच भाषा शिकले तर ते परस्परांना संपूर्णपणें समजूं शकतील. परंतु त्यांच्यांतील समज आतांपेक्षां थोड्या अंशानें तरी वाढेल कीं नाहीं, हें सांगतां येणें अशक्य आहे, कारण विचार व्यक्त होतात ते भाषांच्या आत्म्याद्वारां, त्या त्या भाषेच्या प्राथमिक शब्द-भांडाराद्वारां नव्हे. तरीसुद्धां जो कोणी एखादी भाषा जगतो आणि तिचा आत्मा हस्तगत करतो, तो त्याच क्षणीं विचारांचा एक घाटहि पण मिळवतो. जितक्या भाषा आहेत तितकेच विचारांचे घाट आहेत, असा प्रस्तुत लेखकाचा अनुभव आहे, आणि आपले कांहीं पैलू मूर्त केलेल्या भाषा जेव्हां परस्परांच्या जवळ असतात, तेव्हां त्यांचे घाटहि परस्परांच्या अधिक जवळ येतात.

शास्त्रीय विचारानें आपली भाषा म्हणून गणिताचा अवलंब केल्याचें आढळून येतें. परंतु शास्त्रीय विचार किंवा गणित ही अमुक एक चीज आहे असें आपल्याला सांगतां येत नाहीं. आपण जेव्हां अगदींच








ढिलेपणानें बोलत असूं, तेव्हांच फक्त आपल्याला शास्त्रीय पद्धतीची व्याख्या एखाद्या स्पष्ट विधानानें करतां येते. माझ्या मतें, विश्वाच्या रहस्यांत अधिकाधिक खोल जाण्याच्या शास्त्रज्ञाच्या प्रयत्नागणिक शास्त्राच्या spirit च्या नूतनीकरणाची आवश्यकता निर्माण झालेली आहे. मी तर असेंहि म्हणेन, कीं एक शास्त्रीय पद्धत, एक कलात्मक पद्धत वा एक गूढ (mystic) पद्धत म्हणून कांहीं उरलेलें नाहीं. उदाहरणार्थ, अभिजात गणिताच्या क्षेत्राबाहेरचीं आव्हानें समोर उभीं टाकल्यावर देकार्तची पद्धति ही केवळ एक दुरुस्ती करण्याची आवश्यकता भासणारी पृथक्करणात्मक विचारक्रिया बनते. संभाव्यतांच्या गुंतागुंतीच्या जाळ्यांतून फलदायी मार्ग शोधून काढण्याकरितां आणि समोर ठाकलेल्या समस्यांवर अधिक प्रकाश पाडण्याकरितां शास्त्रज्ञ हवे ते उपाय योजतात. अनुभूतीच्या इतर क्षेत्रांतून उसनवार केलेल्या व्यवहारवाद, दृष्टांत, नमुने ह्या सर्व आणि आणखी किती तरी गोष्टींचा वांटा शास्त्रज्ञ आपल्या संशोधनांत करीत असलेल्या प्रगतींत असतो. केफर किंवा फॅरॅडे यांचें लिखाण वाचल्यावर आपल्याला पटतें, कीं निव्वळ पुरावे बदलल्यानें किंवा विषयावरील वाङ्मयाचा अभ्यास केल्यानें अज्ञाताला जिंकून घेतां येत नाहीं. तर त्याकरितां आत्म्याच्या नूतनीकरणाची आवश्यकता असते. करून पाहणें आणि चुकणें, प्रत्यक्ष सहभागी होणें ह्या गोष्टी कोणत्याहि संशोधनाचा गाभा आहेत.

'शास्त्रीय पद्धति असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां चिकित्सक आणि आपल्या कल्पना आव्हान स्वीकारण्यास तोकड्या पडल्यास अविचल राहण्याची क्षमता या दोन्ही वृत्ति सामावलेलें मन आपल्याला अभिप्रेत असतें–आणि तरी हे दोन्ही गुण शास्त्रज्ञांनीं फारच क्वचित् दाखवले आहेत. शास्त्रीय पद्धति हा अर्थात् एका विचाराचा खुला घाट आहे: समोर आलेल्या वस्तुस्थित्यनुसार स्वतःत बदल घडवण्याची तयारी असलेला, आधींच निश्चित केलेल्या कल्पनांशीं जुळत नाहीं म्हणून कांहींहि बाजूस न सारणारा, आणि अज्ञाताचें खरें ज्ञान व्हावें म्हणून सतत नवींनवीं साधनें हुडकून काढणारा असा आहे. गणितांत ह्या पद्धतीला भावनिक तटस्थता आणि अभ्यासांत अंतर्हित असलेल्या गतिमानतेच्या, म्हणजेच समतोलांतून व बीजगणिती रूपांतरांतून दिसणाऱ्या निष्कर्षांच्या सेवेकरितां वचनबद्धता यांची आवश्यकता असते. सध्यांच्या गणितांचा पाया हा व्याख्या, प्रमेयें आणि सिद्ध केलेल्या गोष्टींनीं बनलेला आहे. या तीन घटकांनींच शास्त्राची भाषा बनते. परंतु गणित ही एक सर्जक क्रियाहि आहे, आणि त्यांत विचाराचे निरनिराळे घाट दिसून येतात. ह्या वस्तुस्थितीमुळेंच दोन पिढ्यांत तफावत पडते, कारण एकाच्या हिशेबीं जें स्वतःसिद्ध व तात्कालिक असतें, त्याची कल्पनाहि दुसरा करूं शकत नाहीं. म्हणून गणिताची व्याख्या जर आपण एकच एक विशिष्ट व मर्यादित गोष्ट म्हणून करून आपली गणिताची कल्पना अतिसुलभ करूं लागलों, तर शास्त्राची गणना एका विशिष्ट प्रकारचा अनुभव म्हणून केल्याइतकीच चूक आपल्या हातून घडेल.

'आपल्या शास्त्रीय संशोधनांत मानवी–बेहिशेबी–तत्त्वाचा विसर पडल्यामुळें आपल्या हातून वेगवेगळ्या समस्यांचा गोंधळ केला जातो; अशामुळें आपण केवळ कधींहि न संपणाऱ्या चर्चा व कधींहि न निघणारा निष्कर्ष असलेले ठराविक सांचे व कृतक–समस्या जन्मास घालत असतों. उदाहरणार्थ, स्थापत्यशास्त्र (engineering) ही शास्त्राची संतति आहे असें सामान्यतः समजलें जातें, आणि यशस्वी तंत्रविद्या ही प्रगत शास्त्रांतून विकास पावते. वास्तविक असें आहे, कीं स्थापत्यशास्त्र हा अँग्लो–सॅक्सन व्यवहारवाद्यांनीं विकसित केलेला विचाराचा घाट आहे; ती कांहीं संदर्भांची एकुलती एक शास्त्रीय चौकट नव्हे. ज्या प्रमाणांत जड शास्त्रांना उत्तरोत्तर अधिकाधिक गुंतागुंतीचीं साधनें लागलीं, त्या प्रमाणांत ह्या शास्त्रांचा विकास स्थापत्यशास्त्राशीं घनिष्टरीत्या संबंधित होता; पश्चिमेंत तंत्रविद्येची प्रगति भू-विज्ञानाच्या बरोबरच होत आली आहे. परंतु तरी अनुभूतीचें विश्व जाणून घेण्याचे सर्वच प्रयत्न विचाराच्या स्थापत्यशास्त्रीय घाटांत बसत नाहींत. ग्रीकांचें एक शास्त्र होतें, त्यांत ते यांत्रिक उपकरणांचा वापर करीत नसत; आंतर–सत्याच्या मध्यस्थींतून बाह्य–सत्य समजून घेण्यांत भारतीयांना नेहमींच रस वाटत आला आहे; प्राचीन चिनी लोकांनीं माणसाच्या आचरणाची किल्ली शोधण्याकरितां आपल्या वास्तवतेचे विविध पैलू धुंडाळले. ह्या भिन्न भिन्न मार्गांनीं माण-

साच्या वास्तवाविषयींच्या जाणीवेच्या कक्षा रुंदावण्यांत उल्लेखनीय यश संपादन केलें. जें कांहीं आहे तें समजून घेण्याचे, व जें कांहीं आहे त्यांतील आपला हस्तक्षेप कमी करण्याचे माणसाचे प्रयत्न जर शास्त्रांत प्रतिनिधित्वानें असतील, तर मग सत्याकडे जाण्याचे माणसाचे वेगवेगळे मार्ग विचारांत घेतलेच पाहिजेत. शास्त्रीय अभ्यासाच्या स्थापत्यशास्त्रीय घाटालाच जर आपण प्राधान्य दिलें, आणि बाकीच्या घाटांचा अस्सलपणा नाकारला, तर त्याचा अर्थ इतकाच होईल कीं शास्त्रीय दृष्ट्या दुर्लक्ष करतां न येण्याजोग्या सत्याची गांठ पडण्यापासून आपल्याला थोपवणाऱ्या एका पूर्वग्रहांतून आपण कार्यान्वित झालों आहोंत.

'कोणत्याहि शास्त्रीय सिद्धांताची किंमत त्याच्या अचूक भाकित करण्याच्या क्षमतेवरूनच सामान्यतः केली जाते. कल्पनांची अचूक भाकिती शक्ति शास्त्रज्ञांना मौल्य वाटणाऱ्या चीजांपुरतीच अकारण मर्यादित केलेली नसती, तर ही कसोटी मान्य करतां आली असती. कारण पाश्चिमात्य शास्त्रज्ञांना तंत्रविद्येंत विशेष रस असल्यानें इतर क्षेत्रांतील घडामोडींकडे दुर्लक्ष करण्याची त्यांची प्रवृत्ति असते; आणि तरी स्वतःला शास्त्रज्ञ म्हणवण्याचा अधिकार आपल्याला आहे असें त्यांना वाटतें. कारण आपल्या भोंवतींच्या रहस्याबाबतच्या स्वतःच्या दृष्टिकोनाबाबत नम्रता असणें, ही एक गोष्ट आहे; आणि मुद्दाम डोळे मिटून रहस्याचें वास्तव अस्तित्वच अमान्य करणें ही एक वेगळीच गोष्ट आहे. सध्यांचा कोणताच जीवशास्त्रीय सिद्धांत हठयोगांतील इंद्रियांच्या नैसर्गिक क्रियांच्या विपर्यासाचें समाधानकारक स्पष्टीकरण देऊं शकत नाहीं–आणि ह्या विपर्यासाच्या वास्तविकतेकरतां पुरेसा पुरावा संपूर्णतया शास्त्रीयरीत्या जमा करण्यांत आला असूनहि जीवशास्त्रज्ञ हें सर्व धुडकावून लावण्यास मुळींच कां-कूं करत नाहींत, आणि तरीहि आपले सिद्धांत पूर्ण व अचूक भाकित करणारे आहेत, असें ते सांगतात. आपल्या ह्या जगांत जे कांहीं जीवजंतु आहेत आणि त्यांच्या जैव क्रिया आहेत, त्यांच्या अस्तित्वाचें व असामान्य गुणधर्माचें कारण सांप्रतचा कोणताहि सिद्धांत देऊं शकत नाहीं, आणि तरी शास्त्रज्ञ अतिशय आत्मविश्वासानें त्या क्षेत्रांत इकडे–तिकडे हिंडतात, आणि त्यांच्याशीं न पटणाऱ्या लोकांच्या कल्पनांना झिडकारून टाकतात– आणि तरी ह्यांच्या स्वतःच्या कल्पना वस्तुस्थितीच्या मानानें अगदीं तोकड्या असतात. एवढेंच काय पण आपल्याला इतिहासांतून व अनुभवांतून माणसाबद्दल जें–जें म्हणून माहित आहे, तें सर्व ज्ञान सामावून घेईल असा एकहि सिद्धांत अजून आपल्याजवळ नाहीं. साधी गोष्ट म्हणजे आपल्याला बाळपणाचा अर्थहि माहित नाहीं. आणि तरी आपल्याला तें संपूर्णपणें समजतें अशा थाटांत शिक्षक वागत असतात, आणि माणूस ही काय चीज आहे, हें आपल्याला माहित आहे अशा आविर्भावांत मानसशास्त्रज्ञ वावरत असतात– आणि तरी त्यांच्यांत आपापसांत मतभेद आहेत आणि एकमेकांचे दृष्टिकोन ते परस्परांपासून संपूर्णतः वेगळे ठेवून मानसशास्त्राच्या भिन्नभिन्न पंथांत सामील झालेले असतात.

' येथें विचाराचा स्थापत्य शास्त्रीय घाट म्हणून नामाभिधान दिलेला हा पक्षपाती दृष्टिकोन हा प्रथमतः अमेरिकेंत दृष्टोत्पत्तीस आला; परंतु आतां तो जलद गतीनें पश्चिमेंतील सर्व मनांची पकड घेत आहे आणि आपल्या विकासाच्या नैसर्गिक क्षेत्रांतूनहि बाहेर जात आहे. Applied शास्त्राच्या निष्कर्षांवरून शास्त्रांतील दृष्टिकोन बरोबर आहेत, असा दावा मांडला जात आहे; उपकरणांत रूपांतरित न करतां येण्याजोग्या ज्ञानाला ' असंस्कृत ' अशी संज्ञा दिली जात आहे; नकाशे व साधनें यांत बसवतां न येण्याजोगें अनुभवाचें क्षेत्र कधींतरी का होईना त्यांत बसवतां येईल अशी आशा बाळगली जात आहे, किंवा मग हें क्षेत्र सपशेल अवास्तव आहे असें म्हटलें जात आहे.

' परंतु सुदैवानें सर्वच विचारवंत हा मार्ग अनुसरत नाहींत. विचाराच्या कोणत्याहि एका घाटाच्या मर्यादा ज्याला जाणवल्या आहेत, आणि अभ्यासत असलेल्या अनुभवांच्या गटांत स्वतःच्या आवडत्या घाटानें केलेल्या ढवळाढवळीबद्दल जो दक्ष आहे, त्याला असें वाटल्यावांचून रहात नाहीं कीं यापेक्षां दुसऱ्या एखाद्या मार्गानें समस्या हाताळली, तर तें फलदायी ठरेल.

' विचाराच्या इतर घाटांसंबंधीं आपण जर स्वतःला अधिक संवेदनाशील बनवूं शकलों आणि ह्या इतर घाटांचा उघडउघड विकास व्यक्तिशः आणि संघशः घडवून आणूं शकलों, तर बरीचशी आधुनिक गुंतागुंत सुटूं शकेल, असें दोन उदाहरणांवरून सूचित होतें.

' शिक्षणाची तपासणी केल्यास असें आढळून येतें कीं त्यांत अनेक घटक कार्यान्वित झालेले आहेत. सामाजिक, वैयक्तिक, तांत्रिक, epistemological इत्यादि इत्यादि. सध्यांचा एकंदर कल असा कीं ह्या अनेक बाजूंपैकीं एकावर किंवा त्याच्या एका पैलूवर सर्व लक्ष केंद्रित करावें. असें करण्यानें शिक्षणाच्या समस्येचा विचार आपण एक सबंध समस्या म्हणून कधींच करीत नाहीं, आणि आपल्याला आधींच माहित असलेल्या आव्हानांशिवाय दुसऱ्या कोणत्याच समस्येला आपल्याला उत्तरें सांपडतील अशी अपेक्षा आपण बाळगूं नये. परंतु मग अद्याप मूर्त रूपहि न घेतलेल्या शैक्षणिक आव्हानांचें काय ?

' दुसरें उदाहरण घ्यायचें तर, त्यांच्या सबंध गुंतागुंतीसह संपूर्ण प्रश्नांना तोंड कसें देतां येईल, या दृष्टीनें ज्ञानाच्या इतिहासाचा पुरेसा अभ्यास आपण केलेला नाहीं. तरीहि आत्तांपर्यंत केलेल्या अभ्यासावरून हें स्पष्ट आहे कीं कोणत्याहि दिशेनें केलेली खरी प्रगति ही विश्लेषणापेक्षां संश्लेषणानेंच साधली गेली आहे. एखाद्या गुंतागुंतीच्या क्षणावर सर्व दिशांनीं प्रकाश फेंकून एकुलता एक प्रकाशकिरण ज्या क्षेत्रांत पोंचूंच शकणार नाहीं, अशीं क्षेत्रेंसुद्धां प्रकाशित होतात. परंतु गुंतागुंतीच्या गोष्टींबाबत अनेकांगी मार्गानें विचार करण्यास शिकण्याच्या कामीं फारच कमी कष्ट वेंचले जात आहेत; मूळच्या संपूर्ण आव्हानाशीं फारच थोडका संबंध उरणाऱ्या लहान-लहान घटकांत समस्यांचें विच्छेदन करण्यांतच अजून खूप श्रम घेतले जात आहेत. विचाराचा स्थापत्यशास्त्रीय घाट अवलंबून संशोधनक्षेत्रांतील कार्यकर्त्यांच्या पलटणी प्रयोगशाळेचीं आधुनिक तंत्रें सुधारून खूप कांहींसें मिळवूं शकतात. परंतु शैक्षणिक आव्हानांना तोंड देण्यास हे उपाय यशस्वी ठरलेले नाहींत. सबंध शैक्षणिक समस्यांवर विधायकरीत्या कार्य करायचें, तर मी ज्याला complex thinking म्हणतों त्या विचाराच्या घाटाचा उघड विकास घडवून आणायला हवा.

' लहान मुलांना समजून घेण्याकरितां आपल्याला विचाराच्या आणखी एका वेगळ्याच घाटाचा अवलंब करावा लागेल – ह्याला मीं multivalent thinking असें नांव दिलें आहे.

' आतां आपल्याला हें माहित आहे कीं आतांपर्यंतच्या आपल्या इतिहासांत आपण अज्ञानाच्या पडद्याचा एक कोपरा किंचितसा वर उचलला आहे, गभीरतर अनुभूतींच्या विस्तीर्ण क्षेत्राकडे उघडणाऱ्या थोडक्या खिडक्या किंचित्‌शा उघडल्या आहेत. आतां आपल्याला आपल्या समजशक्तीच्या सीमा रुंदावायच्या असतील आणि तिचीं आव्हानें स्वीकारण्याचे मानवानें केलेले सर्व प्रयत्न फलदायी करावयाचे असतील, तर आपण आपल्या स्वतःच्या विचाराच्या घाटांची तपासणी केली पाहिजे व त्यांत काय अंतर्भूत आहे व काय बहिष्कृत आहे, [illegible] छडा लावला पाहिजे.

---







श्री. तटस्थ

# राजकीय पक्षांची आचारसंहिता

गेल्या मे महिन्यांत भाटघर (पुणें) येथें समाज प्रबोधन संस्था व गोखले अर्थशास्त्र संस्था यांच्या वतीनें राजकीय पक्षांच्या आचारसंहितेचा विचार करण्यासाठीं एक परिसंवाद भरविण्यांत आला. व त्यांतील चर्चेचे निष्कर्ष आणि तद्विषयक विविध प्रतिक्रिया वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाल्या. या परिसंवादांतील चर्चाविषयासंबंधींच येथें थोडासा ऊहापोह करावयाचा आहे.

## स्वरूप व महत्त्व

अगाऊ लिहिण्यांत आलेल्या लेखांच्या (पेपर्स) आधारानें पूर्वनियोजित विषयावर दहावीस निमंत्रितांत मोकळी चर्चा घडवून आणायची व नंतर शक्य झाल्यास ते लेख व चर्चेचा अहवाल हीं प्रसिद्ध करायचीं असें चित्र परिसंवाद म्हटला कीं डोळ्यापुढें येतें. तथापि या परिसंवादाचें स्वरूप कांहींसें भिन्न होतें. केवळ विचारांची देवघेव एवढाच हेतु त्यांत नव्हता; राजकीय पक्षांच्या आचाराविषयीं कांहीं संकेत निश्चित करण्याचा स्पष्ट हेतु त्यांत होता व सर्व निमंत्रितांनाहि तो कळविलेला होता. यामुळें या मेळाव्याला एका अर्थी कांहींसें सर्वपक्षीय परिषदेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. उलट, परिसंवादाचीं निमंत्रणें व्यक्तींना होतीं, पक्षांना नव्हतीं; आणि कोणत्याहि पक्षांत नसलेल्या परंतु या प्रश्नासंबंधीं जिव्हाळा वाटणाऱ्या कांहींचाहि त्यांत समावेश होता. उपस्थित नेते हे पक्षाचे प्रतिनिधि म्हणून हजर होतेसें दिसत नाहीं. निर्णय एकमतानेंच घेतले पाहिजेत हा आग्रह सर्वपक्षीय परिषदेची कल्पना सूचित करतो; परंतु ते निर्णय उपस्थितांनीं आपापल्या पक्षाकरवीं संमत करून घ्यावेत असेंहि ठरल्याचें आढळत नाहीं. तात्पर्य, विविध पक्षीय नेते व कांहीं स्वतंत्र व्यक्ती यांच्यांत एका जिव्हाळ्याच्या प्रश्नावर झालेली चर्चा व तिचे निष्कर्ष असेंच या परिसंवादाचें वास्तव स्वरूप ठरतें.

या परिसंवादांतील कल्पना नवी नव्हती. राजकीय पक्षांच्या आचाराचे संकेत ठरविण्याचा उपक्रम यापूर्वी केरळमध्यें झाला आहे. असे संकेत अंमलांत आणण्याची जबाबदारी तेथें शासनावर टाकण्यांत आली होती. तसेंच राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींनीं एकत्र येऊन असे संकेत ठरवावेत अशी काहीं काळापूर्वी समाजवादी नेते डॉ. राममनोहर लोहिया यांनीं सूचना केल्याचें व तिच्या अनुषंगानें समाजवादी पक्षानें थोडा फार प्रयत्नहि केल्याचें प्रसिद्ध आहे. तथापि या दोन्हीं प्रयत्नांशीं या परिसंवादाचें स्वरूप फारसें जुळत नाहीं. संकेत निश्चित झाल्यास त्यांचा अंमल शासनाकरवीं व्हावा असें येथें कोणीहि म्हटलें नाहीं. उलट त्यासाठीं स्वतंत्र, शासननिरपेक्ष यंत्रणा निर्माण करतां येईल कीं काय याचाच येथें ऊहापोह झाला. यामुळें कल्पना जुनीच असली तरी तिला येथें नवा घाट दिला गेला; व तो देणाऱ्या दोन्ही संस्था, बौद्धिक पातळी वगळल्यास, चर्चाविषयाशीं कसलाहि प्रत्यक्ष संबंध नसलेल्या होत्या हेंहि येथें नमूद केलें पाहिजे.

•

परिसंवादावरील टीकेंत "हेंहि एक प्रकारचें राजकारणच होय" असा एक सूर आढळतो. कांहींना त्यांत नेत्यांचे नेते, सर्वांचे शास्ते बनण्याची महत्वाकांक्षा दिसते; तथापि हें म्हणणें उचित नाहीं. अशा प्रकारच्या हेत्वारोप करणाऱ्या टीकेकडे दुर्लक्ष करणेंच योग्य होईल. दुसरें टीकाकारांचें म्हणणें असें कीं हा सर्व खटाटोप म्हणजे एका विशिष्ट राजकीय पक्षाला, कम्युनिस्ट पक्षाला, अडचणींत टाकण्याचा कट होय. राजकीय पक्षांच्या आचाराचे संकेत निश्चित करण्याच्या प्रयत्नांत एकादा विशिष्ट पक्ष अडचणींत कसा येतो हें वरवर पाहातां समजणें कठीण आहे. यासाठीं प्रथम कांहीं गोष्टी स्वीकाराव्या लागतील. पक्षोपपक्षांच्या सत्तास्पर्धेत आचारविषयक संकेत पाळणें प्रबळ, सत्ताधारी पक्षाला सुलभ असतें; विरोधी,








अल्पसंख्य पक्षांना त्या योगानें अडचणीच निर्माण होतात असा एक समज संभवनीय वाटतो. परंतु तो बरोबर नाहीं. अल्पसंख्य पक्षांना दीर्घ कालपर्यंत त्याच अवस्थेंत कदाचित राहावें लागेलहि. हें केवळ भारतांतच नव्हे तर अन्यत्रहि घडलें आहे. ब्रिटिश मजूरपक्षाचें याबाबतचें उदाहरण प्रसिद्ध आहे. लोकशाहीचें एक वैशिष्ट्य म्हणजे अल्पसंख्यकांना बहुसंख्य होण्यास पूर्ण वाव देणें. आजचे सत्ताधारी उद्याचे विरोधक, वा आजचे विरोधक उद्याचे सत्ताधारी होण्याची शक्यता तिच्यांत नेहमींच गृहीत धरली पाहिजे. यामुळें बहुसंख्य, व अल्पसंख्य, सत्ताधारी व विरोधक, सर्वांनीच जबाबदारीनें वागण्याची आवश्यकता तिच्यांत आपोआपच येते. चटकन वा नजीकच्या काळांत भविष्यांत बहुमताची आशा दिसत नाहीं म्हणून तें येनकेनप्रकारेण मिळवूं पाहाणारा विरोधक हा लोकशाहीचा कितीहि कंठरवानें उद्घोष करीत असला तरी प्रत्यक्षांत तिच्या मर्यादांचें उल्लंघन करीत आहे असेंच म्हणावें लागेल. आणि नेमकी हीच शक्यता कम्युनिस्ट पक्षाच्या बाबतींत वरील टीकेंतून व्यक्त होते. संहितेमुळें विरोधी पक्षांना अडचणी निर्माण होतील हें म्हणणें कदाचित् लोकशाहीच्या अपुऱ्या आकलनाचा परिणाम म्हणतां येईल. तथापि केवळ कम्युनिस्ट पक्षाविरुद्ध तो कट आहे या विधानांत मात्र कम्युनिस्ट पक्ष हाच भारतीय लोकशाहीविरुद्ध एक कट होय याची पर्यायानें कबुलीच आढळते.

झालेली चर्चा हें एका अर्थी राजकीय पक्षोपपक्षांच्या सदसद्विवेक बुद्धीला आवाहनच होतें. केवळ पक्षनेताच नव्हे तर मुख्य मंत्री देखील असतांना श्रीयुत यशवंतराव चव्हाण यांनीं चर्चेसाठीं प्रत्यक्ष हजर राहण्यांत व तिच्यांत भाग घेण्यांत दाखवलेलें नैतिक मनोधैर्य त्यांच्या आजवरच्या कीर्तीला शोभून दिसणारें असेंच आहे. त्यांच्या उपस्थितीमुळें चर्चेला वेगळेंच महत्त्व प्राप्त झालें हें उघड आहे. निरनिराळ्या पक्षीय नेत्यांनीं दोन दिवस चर्चा करून वैयक्तिक दृष्टीनें कां होईना पण निश्चित निर्णय एकमतानें काढावेत ही घटना लोकशिक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाचीच म्हटली पाहिजे. तिचा अर्थ मात्र योग्य रीतीनें ध्यानांत घेतला पाहिजे.

## प्रश्नाचें सामान्य स्वरूप

चर्चेच्या प्रसिद्ध झालेल्या निष्कर्षावरून चर्चाविषयाचें स्वरूप यथार्थतेनें ध्यानांत घेतलें गेलें नसावें अशी शंका येते. आचार–संहिता ही कांहीं प्रमाणांत आजहि अस्तित्वांत आहेच. मात्र ती बव्हंशीं पक्षांसाठीं नसून पक्षांतील व्यक्तींकरतां आहे. पक्षाच्या बोधचिन्हाला निवडणुकींत देण्यांत येणारी मान्यता हाच काय तो याबाबत महत्त्वाचा अपवाद. एरवीं निवडणुकीला व्यक्ति उभी राहते, उमेदवारानें पाळावयाचीं खर्च, हिशेब, वाहनांचा वापर इत्यादि बाबतचीं बंधनें तिला व्यक्ति म्हणूनच पाळावीं लागतात; व त्यांचा भंग झाल्यास त्याबद्दलहि व्यक्ति म्हणूनच जबाबदारी स्वीकारावी लागते. कल्पना करूं कीं, एकाद्या पक्षाच्या सर्व उमेदवारांच्या निवडणुकी बेकायदेशीर ठरविल्या गेल्या; तरी त्यामुळें पक्षाला कसलाच संघटनात्मक धक्का बसण्याचें कारण नाहीं. "पक्ष ही घटनानिरपेक्ष संघटना होय, कायद्यांत तिला कसलेंहि स्थान नाहीं." असें जें म्हटलें जातें त्याचें मर्महि हेंच आहे. इतर अनेक ऐच्छिक संघटनांप्रमाणेंच हीहि एक संघटना इतकेंच. आणि इतर संघटनांना प्राप्त होणारे घटनात्मक अधिकार व तद्विषयक मर्यादा पक्षाच्या बाबतींतहि लागू पडतात हें उघड आहे.

मग आचारसंहितेचा प्रश्न उद्भवतो कसा ? वर्तनाचे संकेत कायद्यानें निश्चित आहेतच. त्याहून वेगळे आणखी काहीं करण्याची गरज काय ? परिसंवादांतील चर्चेत या प्रश्नाचें उत्तर पक्षांच्या सत्तास्पर्धेत शोधण्यांत आलें असावेंसें वाटतें; व बऱ्याच अंशानें तें योग्यहि आहे. परंतु त्याबरोबरच कांहीं प्रमाणांत तरी ते पक्षसंघटनेच्या स्वरूपांतहि शोधावयास हवें. त्यामुळें निवडणुकीस उभा राहिलेला उमेदवार स्वतःच्या गुणावगुणावर विसंबून न राहातां एका विशिष्ट संघटनेचा घटक बनतो व त्याचें निवडणुकींतील यशापयश हा त्या संघटनेचा मानबिंदु ठरतो. संघटनेचें सामर्थ्य हें त्याच्या यशापयशास कारणीभूत होतें. कोणत्याहि पक्षाच्या वतीनें असो, परंतु बव्हंशीं आपल्या अंगभूत गुणांनीं, सेवा व चारित्र्याच्या आधारावर निवडून येतील अशा व्यक्ती असूं शकतात, नाहीं असें नाहीं. परंतु त्या अपवादभूतच म्हणावयास पाहिजेत. सामा-








न्यतः बहुसंख्य बाबतींत व्यक्तीचें यश हें पक्षाच्या यशांत विलीन होतें असाच अनुभव आहे. सत्तास्पर्धेंत पक्षाला महत्वाचें स्थान असो कीं नसो, हा बदल मात्र अपरिहार्यच होय. आणि यामुळेंच त्याचा अर्थ स्पष्ट होणें जरूर आहे. व्यक्तीच्या गुणावगुणांचें स्थान त्या योगानें पक्षाच्या सामर्थ्याकडे जातें. हें सामर्थ्य पक्ष ज्या ज्या प्रमाणांत निवडणुकांत यशस्वी होईल त्या त्या प्रमाणांत वाढतें असें मूलभूत प्रमेय म्हणून मान्य करण्यास हरकत नाहीं. कारण, अंतीं बहुमत प्राप्त करून सत्ता संपादन करणें हेंच पक्ष संघटनेचें उद्दिष्ट आहे. कार्यक्रम, प्रचार पद्धति, सभासदांचे वा उमेदवारांचे गुणावगुण व चारित्र्य, साधनसामुग्रीच्या पुरवठ्याचीं साधनें इत्यादि, सर्व गोष्टींचें इष्टानिष्टत्व हें अखेरीस यशापयशावरूनच मोजलें जातें. व त्यामुळें "ज्याची काठी, त्याची म्हैस" हाच न्याय व्यवहारांत कायम ठरतो.

ही परिस्थिति अत्यंत अयोग्य होय याबद्दल दुमत होण्याचें कारण नाहीं. यामुळें तिच्यांतून बाहेर पडण्याचा नसला तरी निदान तिला अनिष्ट वळण लागणार नाहीं यासाठीं तरी काहीं उपाय आहे काय असा प्रश्न व्यापक सामाजिक दृष्टिकोणांतून निर्माण होणें स्वाभाविक आहे. तिला आळा घालण्याचें कार्य यशस्वीपणें मतदारच करूं शकतात असें यावर सरळ व साधें उत्तर आहे. सत्तास्पर्धेंत पडलेल्या निरनिराळ्या पक्षांचें वर्तन इष्ट मार्गावर राहील या विषयीची तरतूद परिणामकारकरीतीनें करण्याचें सामर्थ्य फक्त त्यांच्याच ठिकाणीं आढळतें. कार्यक्रमाऐवजीं अन्य गोष्टींनाच महत्त्व देऊं पाहाणाऱ्या, अकारण केवळ भावनांचा प्रक्षोभ निर्माण करूं पहाणाऱ्या, सार्वजनिक वर्तनाऐवजीं खाजगी चारित्र्याची धुणीं धुणाऱ्या, यशप्राप्तीसाठीं हव्या त्या मार्गांचा अवलंब करणाऱ्या पक्षाला सरळ रस्ता दाखविण्याचें काम मतदारच करूं शकतात. तथापि भारतीय लोकशाहीची हीच नेमकी अडचण आहे. जनतेचा मागासलेपणा हेंच आमचें खरें महत्त्वाचें दौर्बल्य आहे. व तें चटकन घालवतां येईल असें नाहीं. यामुळेंच हें अनिष्ट वळण टाळण्यासाठीं तांतडीचा मार्ग म्हणून राजकीय पक्षांकडे वळावें लागतें.

## अडचण व धोके

जनतेकडून पक्षांकडे वळणें हा मूळ प्रश्न सोडविण्याचा पर्यायी मार्ग नव्हे; तो तसा समजला जाणें हें निश्चितपणें धोक्याचेंच म्हणावें लागेल. राजकीय पक्षांनीं कांहीं आचारसंकेतांना मान्यता दिली; नव्हे त्यांचें प्रामाणिकपणें पालनहि केलें, तरी त्यांतून जनतेच्या मागासलेपणाचा प्रश्न सुटलासें म्हणतां यावयाचें नाहीं. उलट, मागासलेपणा घालविणें हें त्या योगानें अधिकच निकडीचें व आवश्यक होण्याचा संभव आहे. तसेंच केवळ पक्षोपपक्षांनीं आचारविषयक कांहीं संकेतांचें पालन केलें कीं आपले "हक्क व हितसंबंध सुरक्षित राहतील" असाहि एक भ्रामक समज जनतेंत रूढ होण्याचा व जागरूकता कमी होण्याचा संभव आहे. तसें होऊं लागल्यास तो एक मोठा धोकाच म्हटला पाहिजे. आचारसंकेतांचें योग्य पालन पुढारलेल्या देशांतील पक्षोपपक्ष बव्हंशीं करीत असतात, तथापि त्यामुळें जनतेच्या जागरूकतेची गरज कोणत्याहि प्रकारें कमी होत नाहीं; वा झालेली नाहीं हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

दुसरा व अधिक महत्त्वाचा धोका म्हणजे आचारसंहिता हेंच पक्षोपपक्षांच्या सत्तास्पर्धेचें एक साधन बनणें हा होय. या मुद्याचा विचार करतांना देशांतील, व महाराष्ट्रांतीलहि, पक्षोपक्षांचें स्वरूप, त्यांची वैचारिक बैठक व त्यांचें तौलनिक सामर्थ्य यांचा विचार होणें आवश्यक आहे. देशांतील राजकारणांत आढळणारी– एक अत्यंत मोठा व बलवान पक्ष व अन्य लहानमोठे विरोधक पक्ष– ही परिस्थिति, महाराष्ट्रांतहि आतां आढळते. विरोधकांतील एकहि पक्ष सत्ताधारी पक्षाच्या तोलाचा नाहीं व म्हणून यथार्थानें पर्याय पक्ष मानतां येत नाहीं. ही वस्तुस्थिति माझ्या समजुतीप्रमाणें कोणीहि नाकारूं शकणार नाहीं. ह्याचा अर्थ काय ? आचारसंकेतांच्या योगानें सबल पक्षावर बंधनें येतील व दुर्बलांना आवश्यक संरक्षण मिळेल असें या प्रश्नाचें उत्तर आहे. व तें स्वाभाविकच आहे. सर्व विरोधक पक्ष एकत्र येऊन देखील सत्तारूढ पक्षाला ते सत्तास्थानावरून काढूं शकतील असा संभव आज एकाद दुसऱ्या राज्याचा अपवाद वगळल्यास कोठेंहि दिसत नाहीं. यामुळें वरील उत्तर स्वाभाविक वाटणें शक्य








आहे. परंतु या बाबत थोडासा अधिक विचार करणें आवश्यक आहे. वर वर्णिलेल्या असमतोल अवस्थेंत सर्वच पक्षांचा तोल सुटणें शक्य आहे. आपणांस कोणी प्रतिस्पर्धी नाहीं म्हणून सत्तारूढ पक्षांत बेजबाबदारपणा येणें शक्य आहे. पण तितकीच वा त्याहून अधिकच शक्यता 'आपण कधी सत्ताधारी बनण्याचा संभव नाहीं' या जाणीवेंतून विरोधक बेजबाबदार बनण्याचीहि आहे. 'अधिकच' म्हणण्याचें कारण 'सत्तास्थान' या कल्पनेंतच मुळीं काहीं एक किमान जबाबदारी अभिप्रेत आहे हें होय. याच्याहि थोडें पुढें जाऊन पाहिल्यास काहीं प्रमाणांत तरी लोकशाहींतील जबाबदारीची जाणीव सत्तारूढ काँग्रेस पक्षानें दाखवली आहे असेंच म्हणावें लागेल. नागरीक हक्कांना घटनात्मक मान्यता देण्यास व देशांत प्रातिनिधिक लोकशाहीची उभारणी करण्यास या पक्षाचीच राजकीय दृष्टि जबाबदार आहे हें नाकारतां येणार नाहीं. व गेल्या दहा-बारा वर्षांत सर्व प्रकारच्या राजकीय अडचणींना तोंड देत असतांना या हक्कांना मर्यादा घालण्याकडे किंवा विरोधकांना नाहींसें करण्याकडे या पक्षाची दृष्टि वळलेली नाहीं. यामुळें सत्तास्थानामुळें निर्माण होणाऱ्या बेजबाबदारीचीं चिन्हें त्याच्या वर्तनांत फारशीं आढळत नाहींत असेंच म्हणावें लागेल. त्याची कार्यक्षमता, कार्यक्रमाचें स्वरूप इत्यादि, इत्यादि गोष्टींचा या मुद्याशीं संबंध नाहीं. अमर्याद सत्ता हातीं येऊनहि सत्तास्पर्धेचें क्षेत्र सर्वांना काँग्रेसनें खुलें ठेवलें हा त्या पक्षाच्या जबाबदारपणाचा एक महत्वाचा व भक्कम पुरावा होय. आचार-संहितेमुळें त्या पक्षावर विशेष बंधनें येतील असें समजण्याचें कारण नाहीं.

या ठिकाणीं विरोधकांचें काय ? हा प्रश्न साहजिकच उद्भवतो. त्यांना संरक्षण मिळेल म्हणजे काय होईल ? या प्रश्नाचें उत्तर कांहींसें कठीण आहे. बहुमत प्राप्त करून घेण्यासाठीं आवश्यक लोकशाही हक्कांचा वापर करण्याचें सामर्थ्य मुळीं राज्यघटनेनेंच दिलें आहे; व त्यांवर बंधनें घालण्याचा वा तें नाहींसें करण्याचा प्रयत्न काँग्रेसनें कधीहि केलेला नाहीं. यामुळें या "विरोधकांचें संरक्षण" या कल्पनेचा अर्थ स्पष्ट होण्यासाठीं थोड्याशा भिन्न दृष्टिकोणांतून विचार करणें आवश्यक ठरतें. व हा दृष्टिकोण म्हणजे पक्ष संघटनेच्या स्वरूपाविषयींचा होय.

सत्ताधारी पक्ष म्हटला कीं केवळ कार्यक्रमानें भागत नाहीं तर तो प्रत्यक्ष अंमलांत आणण्याची जबाबदारीहि घ्यावी लागते हें उघड आहे. त्या बरोबरच भारतीय सत्ताधारी पक्षाच्या बाबतींत आणखीहि एक दोन वैशिष्ट्यें उल्लेखनीय वाटतात. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी काँग्रेस हें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें आंदोलन होतें, विशिष्ट राजकीय पक्षाचें स्वरूप तिला कधींच प्राप्त झालें नाहीं. आजहि हीच परिस्थिति बऱ्याच अंशाचें कायम आहे. फरक इतकाच कीं आतां राष्ट्रीय स्वातंत्र्याऐवजीं राष्ट्रीय विकास हें ध्येय तिच्यापुढें आहे. परंतु त्याबरोबरच कांहीं बाह्य सूचक चिन्हें काँग्रेसनें स्वीकारलीं आहेत; उदाहरणार्थ, खादी, व तीं केवळ काँग्रेस सभासदांपुरतींच वा कार्यकर्त्यांपुरतींच मर्यादित नाहींत. याचें इतर परिणाम येथें विचारांत घेण्याचें कारण नाहीं. फक्त एकाच मुद्याचा उल्लेख आवश्यक वाटतो. खादी व काँग्रेसचें राजकारण यांचा अविभाज्य संबंध जनतेच्या मनांत खोलवर रुजल्याकारणानें कोणाहि खादी टोपी धारण करणाऱ्या व्यक्तीच्या भल्याबुऱ्या कृत्यांची जबाबदारी काँग्रेसवरच पडते, टाकली जाते; मग त्या कृत्यांशीं काँग्रेसचा प्रत्यक्ष संबंध असो वा नसो. अपवाद काय तो इतर पक्षांशीं एकरूप झालेल्या व्यक्तींचा ! याच्या नेमकें उलट उदाहरण द्यायचें तर तें कम्युनिस्ट पक्षाचें देतां येईल. हा पक्ष प्रथमपासून अत्यंत संघटित व शिस्तबद्ध पक्ष आहे. येथेहि कम्युनिस्ट पक्षापेक्षां कम्युनिस्ट आंदोलन किती तरी मोठें आहे अशीच वस्तुस्थिति आढळते. महाराष्ट्रापुरतेंच बोलायचें झाल्यास किती तरी लहान सहान "पक्ष" हे या कम्युनिस्ट आंदोलनाचाच भाग होत असें म्हणतां येईल. व त्या व्यतिरिक्तहि कितीतरी व्यक्तींची, संघटनांच ही अशाच प्रकारचीं उदाहरणें देतां येतील. परंतु त्यांच्या वर्तनाची जबाबदारी कम्युनिस्ट पक्षावर टाकतां येत नाहीं; व पक्षहि ती स्वीकारणार नाहीं. इतकेंच नव्हे तर कम्युनिस्ट पक्षाचें संघटना स्वरूप माहीत असणारांना पक्षनेत्यांच्या वर्तनालाहि पक्ष जबाबदार नाहीं असें म्हणतां येईल. कारण त्या संघटनेंत वैचारिक निश्चिततेला आचारांतील अमर्याद संधिसाधुपणाची जोड दिली गेली आहे. यामुळें पक्षाला सर्व प्रकारच्या वर्तनापासून लाभ घेतां येतो पण जबाबदारी मात्र फक्त पक्ष म्हणून केल्या जाणाऱ्या वर्त-








नाचीच उचलावी लागते. अन्य सर्व गोष्टी " न मया न मया " म्हणून बाजूस टाकतां येतात. यामुळें आचार संहिता स्वीकारणें कॉंग्रेससारख्या पक्षाला वर उल्लेख केलेल्या परिस्थितींत अडचणीचें व कम्युनिस्ट पक्षाला किती तरी सोपें आहे. आपण स्वीकारलेले संकेत प्रत्येक पांढरी टोपी घालणारानें पत्करलेच पाहिजेत असा पहिल्या बाबतींत अर्थ होतो. श्रीयुत यशवंतराव चव्हाण यांनीं परिसंवादाला हजर राहण्यांत अत्यंत मोठें मनोधैर्य दाखवलें असें वर म्हटलें आहे त्याचें मर्म हेंच आहे. उलट, संहिता स्वीकारल्यास आपण ती फार तर पाळूं पण पक्षाचे सभासद नसणारांना आपण कशी पाळा-वयास लावणार असा सवाल श्रीयुत डांगे विचारूं शकतात. आणि पक्षांचे " सभासद " कोण आहेत याचा तुम्हा-आम्हाला मुळीं पत्ताच नाहीं. अनेक निरनिराळ्या प्रकारच्या संघटना वा व्यक्तींद्वारां काम करण्याची कम्युनिस्ट पक्षाची पद्धत प्रसिद्धच आहे. यामुळें " आपण पाळूं पण आपल्या साहाय्यकांनीं ती न स्वीकारल्यास वा मोडल्यास कम्युनिस्ट पक्ष त्याला काय करणार ? " अशी भूमिका श्रीयुत डांगे यांना घेतां येणें शक्य आहे. तात्पर्य, संहिता म्हणजे " दुर्बलांना संरक्षण " या विधानाचा अर्थ कम्युनिस्टां-पुरतें बोलावयाचें झाल्यास " सत्तारूढ पक्षावर मात करण्याची एक संधी " असाच होणार हें उघड आहे. अशा प्रकारें संहिता हीच सत्तास्पर्धेच्या राजकारणां-तील एक साधन बनूं शकते हें ध्यानांत घेणें जरूर आहे.

सर्व राजकीय पक्षांना एकत्र आणण्याचें कार्य-हवें तर खटाटोप म्हणा-महाराष्ट्रापुरतें बोलायचें झाल्यास नवें नाहीं. ज्या दोन संघटनांच्या वतीनें हा परिसंवाद भरविण्यांत आला त्या संघटनांच्या नेत्यांना या बाबत भरपूर अनुभव आलेला आहे. म्हणून परि-संवादांतून निघालेले निष्कर्ष हे केवळ वैचारिक देव-घेवीचे फलित म्हणून न मानतां ते प्रत्यक्षांत आणले जावेत अशी अपेक्षा असल्यास ते पक्ष वा पक्षीय वैचा-रिक दृष्टिकोण असणाऱ्या सर्व संघटनांकरवीं पाळले गेले पाहिजेत असा आग्रह त्यांना धरावा लागेल. "मी तुम्हास प्रेमानें वागवण्यास तयार आहे, तसें करतांना माझा कुत्रा तुम्हाला चावला तर त्याला माझा काय इलाज ? " हें म्हणणें आचारसंहितेच्या चौकटींत बसूं शकणार नाहीं. " पक्ष " ही कल्पना केवळ तांत्रिक अर्थानें घेऊन पुढें जाण्यांत धोका आहे असें त्यांना नम्रपणें सुचवावेंसें वाटतें. हा खटाटोप अकारण "विस्त-वाशीं खेळ " ठरूं नये अशीच या सूचनेमागील भूमिका आहे.

पक्षोपपक्षांच्या योग्य वर्तनाची खरीखुरी हमी जागृत लोकमतांतूनच होऊं शकते. आणि भारतीय पक्ष-राजकारणाच्या बाबतींत इतर सर्व प्रश्न वा अड-चणी जरी क्षणभर बाजूला ठेविल्या तरी हीच मह-त्वाची अडचण म्हणून शिल्लक राहते. बहुसंख्य जनता अडाणी आहे, हा ह्या अडचणींतील एक साधा मुद्दा. या अडाणीपणामुळें सार्वत्रिक मतदान पद्धतीवर आधार-लेल्या शासनपद्धतींत तिचा पाठिंबा मिळवावयाचा म्हणजे सर्व राजकीय पक्षांना तिच्या पातळीवर येऊन बोलावें लागतें ही पातळी मोकळ्या, मुक्त बौद्धिक चर्चेची साहजिकपणेंच राहत नाहीं. उलट ती भावना-त्मक, प्रक्षोभक घोषणांचीच बनते असा सामान्य अनु-भव आहे. गेल्या तीन वर्षांत महाराष्ट्रांत मुख्य मंत्र्यांनीं सर्वतोपरीनें जर तिला आळा घालून राजकीय वातावरण शुद्ध करण्याचा प्रयत्न केला नसता तर महा-राष्ट्राचें राजकीय जीवन आज कोणत्या दर्जाचें बनलें असतें हें सांगणें अत्यंत कठीण आहे. यांतील वैयक्तिक गुणांचा वा चांगुलपणाचा भाग जरी क्षणभर बाजूला ठेविला तरी राजकीय वा सामाजिक जीवनाचे शुद्धि-करणाच्या दृष्टीनें हें कार्य अमोलच समजावें लागेल. त्याचे परिणाम त्यांच्या राजकीय जीवनावरहि होणें अपरिहार्य आहे. उलट व्यापक प्रमाणांतील सामाजिक मागासलेपणामुळें अधिकारारूढ पक्ष वा त्याचे नेते ह्यांच्यांत समजुतदारपणा वाढणें म्हणजे विरोधकांची पर्यायानें अधिकाधिक कुचंबणा होणें होय. अशा तऱ्हेच्या कुचंबणेंतून त्यांच्या ठिकाणीं जनमताचा योग्य दाब नसल्यानें बेजबाबदारपणाची वाढ होण्याचाच संभव गृहीत धरला पाहिजे. विरोधकांमध्यें अशा तऱ्हेचा बेजबाबदारपणा हें एक महत्त्वाचें राजकीय साधन म्हणून मानणारे पक्षहि आहेतच. सत्य आणि प्रचार, विवेक आणि कार्यपद्धति, यांचा त्यांच्या वर्तनांत सहसा कधींहि मेळ बसत नाहीं हा फार जुना अनुभव आहे. कमालीचा संधिसाधूपणा हें त्याच्या राजकीय वर्तनाचें एक अत्यंत महत्वाचें व अटळ असें वैशिष्टय

आहे. यामुळें भावी राजकीय जीवनाच्या दृष्टीनें विचार करतां सत्तारूढ पक्ष आणि विरोधकांतील एक महत्वाचा गट हे अगदीं परस्पर विरोधी दिशेनें जाऊं लागणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. अशा अवस्थेंत या दोन संघटनांनीं त्यांना, पर्यायानें सर्वांनाच एकत्रित आणण्याचा खटाटोप केला आहे, व तो अजून पुरा झालेला नसून यापुढेंहि पुन्हा व्हावयाचा आहे. अशा अवस्थेंत त्यांच्या यशस्वितेबद्दल संशय निर्माण झाल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. ह्या कार्याच्या मुळाशीं असलेल्या या संघटनांचे हेतु शुद्ध असतील पण त्या हेतूचा प्रत्यक्ष परिस्थितीशीं फारसा संबंध नाहीं. या परिसंवादांतून निघालेल्या निष्कर्षाचें म्हणून जें परिपत्रक काढण्यांत आलेलें आहे त्याकडे थोडेसें काळजीपूर्वक पाहिल्यास ही गोष्ट स्पष्ट झाल्यावांचून रहात नाहीं.

परिसंवादांत भाग घेणाऱ्या सर्वांनीं भारतीय राज्यघटनेच्या प्रास्ताविकेंत स्पष्ट उल्लेखिलेल्या उद्दिष्टांवर आपली श्रद्धा असल्याचें एकमतानें म्हटलें आहे; आणि त्या बरोबरच घटनेंत राज्यांना भावी धोरणाविषयीं दिलेल्या आदेशांवरहि आपली श्रद्धा व्यक्त केली आहे. यांचा मूर्त स्वरूपांत व्यावहारिक अर्थ लावावयाच्या बाबतींत राजकीय पक्षांत अनेक मतभेद आहेत असें म्हटलें आहे. या बाबत थोडेसें सूक्ष्मपणें पाहिल्यास राज्यघटनेच्या प्रास्ताविकांत आणि पुढील आदेशांत महत्वाचा फरक आहे हें ध्यानांत घेणें जरूर आहे. उद्दिष्टें, तत्त्वें, इत्यादींचा उल्लेख हा प्रास्ताविकांत आहे. उलट राज्यांस अधिकाधिक प्रमाणांत व्यवहारांत आणावयाच्या धोरणविषयक आदेशांचें स्वरूप पाहिल्यास ह्या प्रास्ताविकांतील तत्वांना, उद्दिष्टांना मूर्त स्वरूप देणारी ती पहिली पायरी आहे असेंच म्हणावें लागतें. याचा अर्थ काय करावयाचा या संबंधानें सर्व पक्षांमध्यें राज्यघटनेच्या अनुषंगानें एकमत आहे असा होतो. हें एकमत केवळ कांहीं विशिष्ट राजकीय वा सामाजिक मूल्यांसंबंधीच नाहीं तर तीं मूल्यें व्यवहारांत कोणत्या स्वरूपांत प्रत्यक्षांत आणावयाचीं या संबंधानेंहि आहे. ही जर खरीखुरी परिस्थिति असेल तर पक्षोपपक्षांच्या राजकीय कार्यक्रमांत कसलाच फरक रहात नाहीं. कारण कार्यक्रम हे व्यवहारांत उतरविण्याचीं उद्दिष्टें जाहीर करण्याच्या हेतूनेंच तयार होतात. त्या संबंधानें सर्व तपशीलवार रचना कार्यक्रमांत असत नाहीं. संधी मिळाली व तीं उद्दिष्टें प्रत्यक्षांत उतरविण्यासाठीं प्रयत्न सुरूं झाले म्हणजे आपआपल्या कुवतीप्रमाणें त्या पक्षांनीं तपशीलवार तयारी करावयाची व तीं अमलांत आणावयाचीं असतात. उदाहरणार्थ, १४ वर्षापर्यंतच्या मुलांमुलींना सार्वत्रिक सक्तीचें व मोफत शिक्षण देणें हा कार्यक्रमाचा एक भाग आहे. त्यासाठीं मुलें किती ? त्यांचें प्रमाण वाढतें आहे कीं घटत आहे ? त्यांना शाळा किती लागतील ? शाळेच्या इमारतीसाठीं सीमेंट, लांकूड वा अन्य सामग्री, वा शिक्षक कोठून आणावयाचे ? पाठ्यपुस्तकें वा अन्य शैक्षणिक सामग्रीचा पुरवठा कसा करावयाचा ? इत्यादि सर्व तपशीलाचे प्रश्न बनतात. जर धोरणविषयक आदेशांचा सूक्ष्मपणें विचार केला तर त्यांत मुख्यत्वेंकरून कार्यक्रमच आढळतो असें म्हणावें लागतें, आणि कार्यक्रम जर एक असतील तर राजकीय पक्षांच्या विरोधाचें क्षेत्र हें स्वाभाविकच अत्यंत संकुचित बनतें, ही गोष्ट या सर्व पक्षीय नेत्यांनी मान्य केली असें म्हटलें जातें. तथापि हें कितपत खरें आहे ह्याचा सूक्ष्मपणें व साकल्यानें पुन्हां विचार होणें अत्यंत आवश्यक आहे असें वाटतें. सामाजिक बदल लोकशाहीच्या आणि शांततापूर्ण मार्गानें झाला पाहिजे या मुद्यावरील एकमताबद्दल तर कितीतरी अधिकच अडचणी आहेत. पक्षांपक्षांतील मतभेदांचें स्वरूप अशा रीतीनें संकुचित झालें म्हणजे दोन पर्याय संभवतात. एक पर्याय विरोधाची धार कमी होणें व सर्वांनीं मिळून कांहीं विशिष्ट मर्यादेंत आवश्यक रचनात्मक वा विकासाचें कार्य करावयाचें आहे हें मान्य करणें. लोकशाहीचा पाया ह्या योगानें अधिक मजबूत होईल अशा श्रद्धेनें राजकीय पक्षांनीं अधिकाधिक सहकार्यानें कार्य करूं लागणें यांतून संभवतें. दुसरा पर्याय म्हणजे विरोधाचा आधार कमी होऊं लागल्यानें विरोधाला अविवेकी प्रक्षोभक स्वरूप प्राप्त होणें व राजकीय बेजबाबदारपणा वाढीस लागणें. हा दुसरा पर्याय उपयुक्त आहे अशी मान्यता असणारे राजकीय पक्ष देशांत आहेत असें म्हणतां येतें. आणि ह्यामुळें पक्षीय संघर्ष दिवसेंदिवस वैचारिक दृष्टीनें अर्थशून्य पण व्यवहारांत अधिकाधिक तीव्र होत जाण्याची शक्यता बळावते. कोणत्याहि राजकीय

पक्षाशीं संलग्न नसलेल्या विचारवंत तटस्थानें या दुसऱ्या पर्यायाला आळा घालण्याचा प्रयत्न करणें हेंच उचित ठरतें. उलट, आपण सर्वांना एकत्र आणून सोवळ्यांत बसायला आणि शुद्ध विचार करावयाला लावूं अशी महत्त्वाकांक्षा बाळगणें हें अवास्तवतेचें लक्षण मानावयास पाहिजे.

राजकीय पक्षांच्या कार्यक्रमांतील भिन्नत्वाचें क्षेत्र संकुचित झालें म्हणजे टीका वा विरोध हीं मर्यादित होतात व आपण एक-पक्षीय राजपद्धतीकडे जावूं लागतों असें समजण्याचें कारण नाहीं. एकाच राजकीय पक्षाचें अनुयायित्व सर्वांनीं पत्करण्याची मुळीच जरूरी नाहीं. पण मुख्य अडचण आहे ती अशी कीं महाराष्ट्राच्या किंबहुना भारताच्या राजकीय जीवनांत आज ज्या प्रकारची टीका वा समीक्षा आवश्यक आहे त्या प्रकारची टीका वा समीक्षा करण्याच्या दृष्टीनें विरोधी पक्ष-संघटना ही अधिकाधिक कुचकामाची ठरत आहे. व्यापक आणि कांहींसें अस्पष्ट बोलावयाचें म्हटल्यास 'शेतीच्या सुधारणा आधीं कीं उद्योगधंदे,' 'उद्योगधंदे मोठे असावेत कीं लहान' असे प्रश्न काढतां येतात, नाहीं असें नाहीं; पण केवळ शेतीच्या सुधारणा वा केवळ मोठे उद्योगधंदे वा लहान उद्योगधंदे अशी भूमिका कोणीहि घेवूं शकत नाहीं. यामुळें चटकन या वा त्या पर्यायाच्या तपशीलवार विचारांना चांगलेंच प्राधान्य प्राप्त होतें आणि हा तपशीलवार विचार योग्य रीतीनें करण्याचें आणि त्या संबंधानें अडीअडचणीं वा संभाव्य आक्षेप यांचें निराकरण करण्याचें सामर्थ्य पक्ष-संघटनेंत असत नाहीं. अत्यंत गुंतागुंतीच्या अशा या विषयावर काळजीपूर्वक व विचारांअंतीं लोकमत निर्माण करण्याचें कार्य हें पक्ष-संघटनेच्या दृष्टीनें महत्त्वाचें ठरूं शकत नाहीं. कारण त्यांत लोकमत स्वमतानुकुल बनविण्यापेक्षां लोकमत वैचारिक दृष्टीनें अधिक जागृत बनविणें यावरच अधिक कटाक्ष असतो. म्हणून लोकमत स्वमतानुकुल बनवावयाचें असल्यास घोषणा शोधणें, कुलंगडीं काढणें, वैयक्तिक बाबींवर हल्ला चढविणें, एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढणें हेंच स्वरूप पक्ष प्रचाराला घ्यावें लागतें, नाहीं तर तो प्रभावी ठरूं शकत नाहीं. अर्थात लोकमत ज्या ज्या प्रमाणांत अधिकाधिक जागृत होत जाईल त्या त्या प्रमाणांत ह्या मार्गाचें प्रभावीपण हें फोल ठरत जाईल हें उघड आहे. पण ही गोष्ट अत्यंत दीर्घकालीन असल्यानें त्यांतून पक्षाच्या दृष्टीनें तात्कालिक अडचण निर्माण होत नाहीं.

या दृष्टीकोणांतून भाटघरच्या परिसंवादांतून निघालेल्या संकेतांचा विचार केल्यास ते संकेत अगदीं साधे व कांहींसे भोंगळ स्वरूपाचे वाटतात. त्याबद्दल विस्तारानें ऊहापोह करण्याचें येथें कारण नाहीं. कांहीं प्रमाणांत, कांहीं ठिकाणीं कोणत्याहि पक्षाला अधिक प्राप्त करून घेण्याची संधी नसल्यास ते कदाचित उपयुक्त ठरतीलहि. तथापि, सामान्यतः पाहिल्यास त्यांच्या उपयुक्ततेबद्दल शंका येणेंच अधिक स्वाभाविक व वास्तव आहे असें म्हणावें लागतें. या दृष्टीनें परिसंवादांतून निघालेल्या निष्कर्षांत फक्त एकदोनच महत्वाच्या गोष्टी पुढें आल्या असें म्हणतां येईल व त्यांचा थोडक्यांत उल्लेख करून तूर्त हें लेखन पुरें करणें उचित होईल.

पहिली गोष्ट म्हणजे वर्गीकृत जमातीबाबतींतील होय. त्यांतील कांहींनीं बौद्धधर्माचा स्वीकार केला असला तरी योग्य चौकशी केल्यावाचून त्यांच्या राखीव जागांचें प्रमाण कमी करूं नये या संबंधीं केंद्र सरकारकडे द्यावयाचें निवेदन पत्र. हा प्रश्न महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास अत्यंत जिव्हाळ्याचा आहे हें उघड आहे, आणि ज्या ज्या सवलती या जमातींना आजवर दिल्या गेल्या त्या त्या सवलती इतःपर त्यांतील कांहींनीं बौद्धधर्म स्वीकारला ही गोष्ट मान्य करूनहि कायम रहाव्यात ही भूमिका सर्वसंमत झाली ही अत्यंत समाधानाची गोष्ट म्हटली पाहिजे.

दुसरी गोष्ट म्हणजे सहकारी सोसायट्या, स्थानिक संस्था इत्यादि संबंधीं होय. ह्यांच्या व्यवहारांत पक्षीय राजकारणानें धुडगूस घालतां कामा नये. त्यांच्या व्यवहारांत पक्षीय-हितसंबंध साधण्याच्या वा वाढविण्याच्या हेतूस प्राधान्य नसावें हा संकेत अतिशय इष्ट असाच म्हटला पाहिजे, अर्थात तो प्रत्यक्ष अंतर्गत व्यवहारांपुरताच राहणार हें उघड आहे. एखाद्या पक्षाच्या कार्यकर्त्यांचें बहुमत असलेली सहकारी संस्था उत्तम रीतीनें आपला व्यवहार चालवीत आहे, तिच्या कारभारांत सर्व प्रकारचा निःपक्षपातीपणा व सहकार्याचीं उद्दिष्टें सफल करण्याच्या हेतूनें सर्व प्रकारचे प्रयत्न होत आहेत असें दृश्य दिसल्यास अप्रत्यक्षरित्या लोक त्या पक्षाकडे आकृष्ट होतील ही गोष्ट संभवनीय व स्वाभा-







विक आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र त्यांनीं पक्षीय दृष्टीनें विचार करितां कामा नये हें म्हणणें रास्त आहे. ही चर्चा केवळ सहकारी संस्था वा स्थानिक संस्था पुरतीच कां मर्यादित ठेवली गेली हें समजत नाहीं. उदाहरणार्थ, शिक्षणाच्या क्षेत्राकडेहि याच दृष्टीकोणांतून पाहिलें जाणें आवश्यक आहे. विशेषतः विद्यापीठांच्या बाबतींत पक्षीय राजकारणानें जर धुडगूस घालावयास सुरवात केली तर भावी पिढीचें अत्यंत मोठें नुकसान त्यांतून होईल हें उघड आहे. कामगार संघटनेच्या बाबतींतहि हा दृष्टीकोण कां स्वीकारला जावूं नये हें समजत नाहीं. तात्पर्य सामाजिक जीवनांत अशा अनेक निरनिराळ्या क्षेत्रांतील संघटना वा संस्था आढळणें शक्य आहे–आणि त्या आहेतहि–कीं, त्यांच्या व्यवहारापासून पक्षीय राजकारण अत्यंत काटेकोरपणानें दूर ठेविलें पाहिजे. असें झालें तरच खरीखुरी लोकशाही निर्माण होण्याचा संभव उत्पन्न होऊं शकेल, एरवी नाहीं असा स्पष्ट इशारा देऊन तूर्त थांबणें उचित होईल.





अनुक्रमणिका








प्रा. भीमराव कुलकर्णी

# अच्युत बळवंत कोल्हटकर–वाङ्मयदर्शन*

१८७४ ते १९२० हा कालखंड मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने अत्यंत अपूर्व असाच म्हणावा लागेल. ह्या कालांत महाराष्ट्रांत जें विचारमंथन झालें, जी स्वातंत्र्याकांक्षा अत्यंत ज्वलंत भावनेने सामान्य माणसापर्यंत पोचली आणि बुद्धिवादाच्या प्रखर भूमिकेवरून ज्या समाजस्थितींतून समाजाला कात टाकावयाला लावलें, त्याला मराठी वाङ्मयांत तोड नाहीं. केवळ वाङ्मयीन दृष्ट्याच नव्हे तर जीवनाच्या सर्व क्षेत्रांत केवळ एवढ्याच काळांत इतकीं मोठमोठीं हिमालयीं माणसें निपजलीं कीं चिपळूणकर–आगरकर–टिळक ह्या एव्हरेस्ट–गौरीशंकर–कांचनगंगेपुढें बाकीचीं अनेक मोठमोठीं शिखरें त्यांच्या प्रभेपुढे क्षणकाळ झाकोळलीं गेलीं. किंबहुना ह्याच काळांत जीवनांतील सर्व क्षेत्रांतील विचार–मग तो सामाजिक, धार्मिक वा राजकीय असो–वाङ्मयविशेषांनी युक्त अशा नित्य नव्या मनोहर रूपानें आविष्कृत झाला आणि त्यानें मराठी भाषा आणि वाङ्मय यांवर पसरलेला तमोयुगाचा पडदा मोठ्या त्वेषानें टराटर् फाडून टाकला. विश्वविद्यालयाचे संस्कार झालेल्या पंडितांना इंग्रजी भाषा ही इतकी सरावाची झालेली होती, आणि तीहि एका विशिष्ट पराभूत मनोवृत्तींतून कीं, न्या. रानडे-भांडारकर–तेलंग सारख्या अवघ्या विश्वांत ज्यांच्या बुद्धीचें कौतुक व्हावें, अशा महाराष्ट्राच्या सुपुत्रांनी आपला महत्त्वाचा ग्रंथसंभार लीलेनें इंग्रजींतून हाताळला आणि बिचारी त्यांची मायबोली उपेक्षेच्या शरमेने खाली मान घालून हें त्यांचें कौतुक बघत राहिली. १८६० पासून १८७४ पर्यंतच्या महाराष्ट्रांतील एकंदर सामाजिक स्थितीचा विचार करतांना एक स्पष्ट चित्र डोळयांपुढें उभें राहतें. त्यामध्यें इंग्रज हे विजिगीषु आणि सर्वसामर्थ्यवान असे प्रभु आहेत. त्यांच्या प्रभुत्वाने दिपून त्यांच्या अनुकरणेच्छेने लीन झालेली रानडे-भांडारकरांसारखी तेजस्वी मंडळी सरकारी नोकरीची सोनेरी बेडी सांभाळून स्वतःच्या ऐहिक उन्नतीचा विचार करीत आहेत. दीर्घोद्योग आणि चिकाटी ह्या इंग्रजांच्या नवीन गुणांनी स्वतःचें उत्थापन करण्यासाठी तन–मन–धन वेचणारी ही मंडळी महाराष्ट्रास केव्हांहि वंदनीय अशीच आहेत; कारण ह्याच काळांत द्वितीय-बाजीरावी दुर्गुणांचा भस्मासुर मध्यमवर्गीय नोकरशाहींत थैमान घालीत असतां चारित्र्याच्या दृष्टीने अत्यंत पवित्र व निर्मळ वर्तन असलेल्या ह्या मंडळींतूनच प्रथम हळूहळू महाराष्ट्राची लोपलेली अस्मिता जागी होऊं लागली होती. परंतु वरील दोन्ही वर्ग आणि एकंदरीत मध्यमवर्गीय सामान्य जनता ( ह्या कालखंडांत जी जागृति झाली असें आपण म्हणतों ती मध्यमवर्गींयापुरतीच मर्यादित होती. त्याच्या खाली ती जाऊंच शकली नाही आणि जाणें शक्य नव्हतें. ) ह्यांमध्यें एक फार मोठी दरी निर्माण झाली होती. थोडा विचार केला तर मध्यम वर्गीयांच्या मनामध्यें पाश्चात्य राज्यकर्त्यांबद्दलची जी परकेपणाची आणि त्याहिपेक्षां जी एक दरारा, भय निर्माण होण्याची भावना होती तीहि ह्या लोकांबद्दल होती; फरक एवढाच की, ती आदरमिश्रित होती. म्हणजेच सामान्य जनता आणि राज्यकर्ते यांमध्यें जो दुरावा होता तोच सामान्य जनता आणि विचारवंत यांमध्यें होता. कारण ह्या विचारवंतांना जरी सामान्य जनतेच्या उद्धाराची कळकळ असली तरी त्यांचा ओढा मूलतः राज्यकर्त्यांकडेच होता.

हा दुरावा पहिल्या प्रथम विष्णुशास्त्र्यांनी दूर केला आणि सामान्य जनतेमध्ये आत्मविश्वासाचीं बीजें पेरलीं. तसें पाहिलें तर बुद्धिवादाच्या कसोटीवर घासून पाहतां विष्णुशास्त्री आणि वर उल्लेखिलेले विद्वान् यांमध्ये विष्णुशास्त्र्यांकडे बुद्धिवादाचा तीव्र वारसा आलेला आहे असें वाटत नाही. बुद्धिवादाच्या दृष्टीने रानडे–भांडारकर–तेलंग ह्यांपेक्षा विष्णुशास्त्र्यांचें कर्तृत्व

* अनाथ विद्यार्थी गृह, पुणें, प्रसिद्ध करीत असलेल्या अच्युत बळवंत कोल्हटकर- वाङ्मयदर्शन या पुस्तकाची प्रस्तावना.

क्षीण आहे. परंतु विष्णुशास्त्र्यांनी निर्माण केलेलें नवें चैतन्यदायी व स्फूर्तिप्रद वातावरण हें इतकें महत्त्वाचें आहे की, डॉ. केतकरांनी त्यांना 'अर्वाचीन पुण्याचे जनक' असें कां म्हटलें आहे हें ताबडतोब लक्षांत येतें. खरोखर 'आधुनिक महाराष्ट्राचे जनक' हीच उपाधि त्यांच्या बाबतींत अधिक सार्थ ठरेल. स्वदेश, स्वभाषा आणि स्वधर्म यांच्या अभिमानाचे सर्व पैलू केवळ विष्णुशास्त्र्यांच्या लेखणीने उजळून टाकले आणि त्यांतूनच टिळक, आगरकर ही परिणामतः परस्परविरुद्ध वाटणारी आणि वस्तुतः एकाच विष्णुशास्त्र्यांच्या व्यक्तित्वांतून साकार होऊन विष्णुशास्त्र्यांपेक्षाहि मोठा पल्ला गाठणारीं दोन तेजस्वी टोकें होत. चिपळूणकर, टिळक, आगरकर यांच्या एकंदर कार्याचें थोडक्यांत अवलोकन केलें असतां स्वार्थत्याग, निष्ठा, धडाडी आणि चारित्र्यसंपन्नता या बाबतींत महाराष्ट्रांत फार मोठी परंपरा निर्माण करण्याचें श्रेय ह्या त्रयीला देण्यांत येतें, परंतु त्याहिपेक्षां ज्या एका डोळस योजकतेनें राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत गोठलेली दूषित वाफ त्यांनी उडवून लावली ती अधिक परिणामकारक ठरली व त्यांतूनच सर्व भारताचें महाराष्ट्र हें तत्कालीन आकर्षण ठरलें. अशा या काळांत मराठी वाङ्मय क्षितिजावर आणि विशेषतः वृत्तपत्र व्यवसायांत देदीप्यमान अशी प्रभा पसरली असतां कित्येक मोठमोठ्या विद्वानांचें लेखन जनसमुदायाचें फारसें आकर्षण बनूं शकलें नाहीं. दोनच व्यक्तींनीं मात्र अल्पावधींत लोकप्रियतेच्या बाबतींत टिळकांच्या लेखणीलाहि कांही काळ मागें टाकलें. शिवरामपंत परांजपे व अच्युत बळवंत कोल्हटकर ह्या त्या दोन व्यक्ति होत.

चिपळूणकरांनी रुजविलेली आणि टिळकांनी वाढविलेली पारतंत्र्याबद्दलची अपार चीड आणि स्वातंत्र्याबद्दलची नितान्त निष्ठा परांजप्यांनी काव्य आणि कल्पकतेच्या साहाय्याने अधिक तीव्र केली, तर चटकदारपणाची चुरचुरीत फोडणी देऊन अच्युत बळवंतांनी सहजासहजीं याच गोष्टी लोकांच्या गळीं उतरविण्यांत फार मोठें यश संपादन केलें. एकाने उपहास, उपरोधाच्या शस्त्राने प्रतिपक्षाला घायाळ केलें, रक्तबंबाळ केलें आणि काव्यकल्पनांच्या कारंजांतून इंद्रधनुष्याच्या सप्तरंगाची बेसुमार उधळपट्टी करून मराठी जनतेला चकित करून सोडलें; तर दुसऱ्याने उपहासाच्या माफक गुदगुल्यांनी आणि अतिशयोक्तीच्या रंजक कलागुणांनी चटकदार कल्पनांच्या नंदनवनांतून मराठी वाचकांना फेरफटका मारावयास लावलें. एकाने 'काळ सूड सूड म्हणून ओरडला' अशी तारस्वरांत गर्जना केली आणि ही गर्जना महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत कंपित होत होत अंतःकरणें छेदून उसळत्या रक्ताच्या तरुणांचीं माथीं भडकलीं आणि सशस्त्र क्रांतीच्या ज्वालाग्रही विचारांनी क्रांतीचा जयजयकार गर्जवीत ते बेहोष झाले; तर दुसऱ्याने चहा-चिवडा-चिरुटांचा आस्वाद घेतां घेतां 'संदेश' च्या रकान्यांतून स्वच्छंदपणे त्यांच्या गळीं स्वदेश आणि स्वातंत्र्यप्रीति उतरविली. एकाने भाषेंतील सर्व प्रकारच्या वक्रतेचा परिणामकारक प्रयोग करून सरकारच्या वक्रदृष्टींत सापडूनहि ह्या चक्रव्यूहाची किल्ली न चालवितां आल्यामुळे सरकारला हैराण केलें तर दुसऱ्याने कधी वक्रता, कधी सरलता, कधी सामोपचारता तर कधी उघड उघड चिथावणी यांमुळे सरकारचा रोष ओढवून घेऊन कधी तुरुंगवास तर कधी जामिनकी यांसारख्या कटकटींतून वारंवार जाऊनहि आपली ईर्ष्या किंचितहि हटूं दिली नाहीं.

आणि म्हणूनच मराठी गद्याच्या वैभवरूपी दालनांत शिरतांना आपणाला परांजपे—कोल्हटकरांच्या दालनामध्यें अधिक काळ थांबावें लागतें. मराठी लेखणीची अधिकाधिक कलाकुसर निबंध-प्रांतांत याच दालनांतून बुद्ध्या घडविलेली आहे आणि ही कलाकुसर आपआपल्या दालनांत या दोघांनी केवळ आपल्याच हातच्या लेखणीने केली हें आठवलें म्हणजे क्षणभर मराठी माणूस नतमस्तक होतो. या दालनामध्यें दुसऱ्या कोणाचा फारसा हातभार नाहीं आणि तरीहि त्यांच्या लेखणीची जिद्द इतकी हटवादी कीं, तिने वाग्देवीला फारच थोडी उसंत घेऊं दिली. तसें पाहिलें तर लेखणीचेंच या दोघांना मोठें व्यसन. चिपळूणकरांना महाराष्ट्रांतील मराठी भाषा आणि संस्कृति यांतील अनवस्था पाहून अगदीच राहवलें नाहीं म्हणून त्यांनी लेखणीरूपी छिन्नी हातांत घेतली आणि मराठी संस्कृतीवर चढलेला चौपदरी गंज छेदून काढला. अत्यंत उपेक्षेच्या [illegible]ांत 'अमृतातें







पैजा जिंके' अशा प्रतिज्ञेने सिद्ध झालेल्या मराठी भाषेंतील मनोहरविलास त्यांना दाखवावयाचा होता म्हणून त्यांनी लेखनासाठी वाचनाचे अपार परिश्रम घेतले, त्यामुळेच की काय गैरसमजाने गंगाधर गाडगिळांसारख्यांनी 'चिपळूणकरांना मराठी लिहितांना फार कष्ट होत असले पाहिजेत" असले विचित्र उद्‌गार काढले. टिळक आगरकरांना देखील मराठी वृत्तपत्रसृष्टींत आपद्धर्म म्हणूनच उतरावें लागलें. परंतु परांजपे कोल्हटकर तर या प्रांतांत लेखणीच्याच व्यसनापायी उतरले. कोल्हटकरांच्या बाबतींत तर 'स्वातंत्र्य, निर्भेळ स्वातंत्र्य, संपूर्ण स्वातंत्र्य, आपल्या परंपरेचे अभिमानी पाईक असें भारतीय स्वातंत्र्य' हा त्यांचा छंद खरोखर दुय्यम होता, लेखणी हाच त्यांचा खरा छंद होता. ह्या लेखणीच्या छंदांत अच्युत बळवंतांना हटविणारा व्यसनी लेखक महाराष्ट्रांत कोणीहि झाला नाहीं असें म्हटलें तर अतिशयोक्ति होऊं नये. एकदा लेखणी हातांत घेतल्यानंतर अच्युत बळवंतांनी तिच्याशीं कधीच प्रतारणा केली नाहीं. तिला क्षणभरहि अंतरणें त्यांना सहन होत नसे. या लेखणीच्या छंदापायीं त्यांनीं स्वास्थ्याची, संसाराची, खुद्द जन्मदात्या पित्याची आणि लेखणीने मध्यंतरीं वाकडें वळण घ्यावयाचें मनांत आणल्यानंतर ज्यांच्याबद्दल नितान्त निष्ठा आहे अशा लोकमान्य टिळकांची देखील पर्वा केली नाही. अच्युतरावांनी सरकारने बंद केलेलें 'संदेश' दैनिक पांच वेळा चालू केलें आणि सहाव्यांदा चालू करण्याची धडपड चालू असतांनाच काळाने त्यांच्यावर झडप घातली. 'संदेश' बरोबरच दैनिक 'मेसेज' नांवाचें इंग्रजी दैनिक सुरू केलें. 'श्रुतिबोध' मासिक तर इंग्रजी, मराठी, गुजराती, हिंदी या चारहि भाषांतून चालविलें. याशिवाय साप्ताहिक देशसेवक, मासिक उषा, दैनिक इंदुप्रकाश, साप्ताहिक युगांतर, साप्ताहिक चाबूक; साप्ताहिक चाबूकस्वार, साप्ताहिक संदेश, दैनिक राष्ट्रमत इत्यादि नियतकालिकांचें त्यांनी संपादन केलें. तसेंच जवळजवळ डझनभर निरनिराळ्या नियतकालिकांचे ते मुख्य लेखक होते. नाटकें, कादंबऱ्या, गोष्टी आणि इतर विषयांवरचीं पांच-सहा पुस्तकें हा त्यांच्या फावल्या वेळचा प्रपंच. खरोखर अच्युत बळवंतासारखा लेखणीचा व्यसनीं अच्युत बळवंतच.

म्हणूनच अच्युत बळवंतांकडे पाहतांना त्यांच्या चरित्राच्या सनावळी-भाकडकथा विस्ताराने सांगण्यांत अर्थ नाही. त्यांनीं लिहिलेल्या शिवरामपंतांवरील लेखाप्रमाणेंच त्यांचें कर्तृत्व आणि त्यांचें व्यक्तिमत्त्व यांचाच अधिक ऊहापोह करणें उपयुक्त ठरेल. त्यांच्या वैचित्र्यपूर्ण व नाट्यपूर्ण जीवनांतील कांही महत्त्वाचीं वैशिष्ट्यें नमूद करण्यानेच त्यांच्या लेखनामागचें व्यक्तिमत्व समजूं शकेल. अच्युतरावांनी अनेक वर्तमानपत्रें काढलीं आणि तीं आपल्या डोळ्यांसमोर बुडतांना पाहिलीं. याचें कारण वर्तमानपत्रें चालविण्यासाठी जो व्यवहार लागतो, त्याचें त्यांच्याशीं वैर होतें. त्यांच्या बालपणचें चरित्र पाहिलें तर 'श्रीगणेशायनमः' यांतील सुरुवातीचें 'श्री' हें अक्षर त्यांना कित्येक दिवस काढतां येत नसे असें दिसून येतें. खरोखर श्रीने अच्युत बळवंतांच्या कार्यांत अनेक अडचणी आणि मानहानीचे प्रसंग निर्माण केले. आपल्या चुलतबंधूबद्दल लिहितांना चिंतामणराव कोल्हटकरांनीं लिहिलें आहे, 'लग्न झाल्यानंतर तो एल्‌एल्. बी. च्या अभ्यासासाठी मुंबईला गेला. सर्वजण त्याला एक भोळाभाबडा, साधा, जगाच्या व्यवहाराचें पूर्ण अज्ञान असणारा असें मानीत असत - आणि उगाच मानीत नसत, या स्वारीचें वागणेंच तसें असें. हा अभ्यासाला बसला असतां याला पिण्याकरितां दुधाचा पेला पुढे नेऊन ठेवला तरी हा आपल्या अभ्यासांत इतका मग्न असे की, मांजर येऊन तें दूध पिऊन गेलें तरी याला दाद नसे. एखादा शब्द घोकायला सुरुवात केली की, त्याचें इतकें पीठ पडे की, दादांना शेवटीं सांगावें लागे, 'बग्या आतां पुरे कर. त्या खांबाचा सुद्धां तो शब्द पाठ झाला...' व्यायाम करायला गेला म्हणजे व्यायामच करी. फिरायला गेला म्हणजे पांचसात मैल सहज जाऊन येई. थोडक्यांत म्हणजे परमहंस साधूची त्याची वृत्ति होती.'[1] शिक्षक म्हणून अच्युतरावांनी साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूल मध्ये दोन वर्षें काढलीं. लांब काळा कोट, जरीचा तांबडा रुमाल आणि पायांत जोडे असा त्यांचा पोषाख; परंतु हा पोषाख अर्धा अधिक तास खपून व्यवस्थितपणे त्यांच्या अंगावर चढविण्याचें काम घरच्या मंडळींना करावें लागे. नंतरच्या काळांत देखील अच्युतरावांनी कधी आपल्या शरीराकडे,

१. बहुरूपी पृ. ३४.

पोषाखाकडे लक्ष दिलें नाही. वि. ह. कुलकर्ण्यांनी लिहिलें आहे,[२] "त्यांच्या मनाची प्रसन्नता अगदी बिकट प्रसंगींहि कधी ढळली नाहीं. शेकडो संकटांना तोंड देऊनहि त्यांची उल्हसित वृत्ति कायम टिकली होती. त्यांचा स्वभाव निसर्गतःच आनंदी होता. आपत्तींचे अनेक तडाखे सहन करून त्यांचें मन घट्ट बनलें होतें. त्यांच्या स्वभावाप्रमाणे त्यांची मूर्ति व वागणुकहि विनोदी होती. त्यांचा शरीरांचा बांधा, त्यांचें बसकें व चपटें नाक, दांत कांहींसे पुढे आल्यामुळे त्यांच्या चेहऱ्यावर विलसणारें एक प्रकारचें मिष्किल हास्य, त्यांचें टकल पडलेलें शिरस्त्राणरहित डोकें, त्यांची केसांचीं झुलपें ठेवण्याची कांहीशी जगावेगळी तऱ्हा, चालतांना व व्याख्यान देतांना खिशांमध्ये हात घालण्याची सवय, पायमोजे घालूनहि केव्हां केव्हां जोडे वापरण्याची त्यांची पद्धत व कोटाचीं बटणें लावल्यामुळें पोटाचा आकार दर्शविणारें त्यांचें जाकिट हीं सर्व एक समयावच्छेदेकरून दिसलीं म्हणजे कोणालाहि हंसू कोसळल्याशिवाय राहात नसे."

या आणि अशा आणखी कांही कोल्हटकरांच्या जीवनांतील पैलूंचें निरीक्षण केलें असतां त्यांच्या लेखनांतील अनेक वैशिष्ट्यांचें मर्म लक्षांत येतें. कोल्हटकरांच्या लेखनांतील नावीन्य, चटकदारपणा व वैचित्र्य यांमागे त्यांची बहुश्रुतता हात जोडून उभी असलेली दिसते. संस्कृत आणि इंग्रजी वाङ्मयांचा त्यांचा व्यासंग अगदीं लहानपणापासूनच समृद्ध असल्याने योग्य तो परिणाम करण्यासाठी योग्य तो काव्यसंदर्भ, कथासंदर्भ, शब्दसंदर्भ त्यांना चटकन् सुचतो. केवळ व्यासंग असता तर त्यांचें लेखन अतिशय जड झालें असतें. या व्यासंगामागे एक प्रकारचा अवखळ, खेळकर मिष्किलपणा आहे. साताऱ्यामध्ये विक्षिप्तपणा आणि मिष्किलपणा या बाबतींत त्यांनी तरुणपणींच मोठें नांव कमाविलें होतें. जुन्या जमान्यांत भर रस्त्यांतून दिवसाढवळ्या ते आपल्या पत्नीसह हिंडत असत. कोटेश्वराच्या मंदिरांत प्रयोग म्हणून त्यांनी कथेचा कार्यक्रम ठरविला व सातारकरांना त्यांनी एकापेक्षा एक आश्चर्याचे धक्के दिले. 'अंगरखा, पागोटें, उपरणें असा पोषाख न करतां त्यांनी कोट व पगडी असाच पोषाख केलेला होता. उपरणेंसुद्धां घेतलें नव्हतें. मग कथेकरीबुवांनीं नमन वगैरे संस्कृत श्लोकांनी करून हरदासाच्या मूळ पदाला अशी सुरवात केली की, श्रोते विस्मयचकित झाले! नेहमी कथेकऱ्यांच्या कथा ऐकणारे श्रोते या हरदासबुवाच्या मूळपदाच्या पालुपदाच्या श्रवणाने चाटच झाले. 'हजरत अल्ला, सब दुनिया पालनवाला' अशी त्या पदाची सुरुवात होती.'[३] सातारला न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक असतांना देखील तेथील 'शाहू' या वृत्तपत्रांत 'न्यू इंग्लिश स्कूल' च्या सर्व शिक्षकवर्गाची झडती घेणारा एक खूप मोठा निनांवी लेख प्रसिद्ध झाला. गांवभर खळबळ उडाली. त्या लेखकाने एकाहि शिक्षकाला दयामाया दाखविली नव्हती. 'मिशा काढणारे व बायकोला घेऊन रस्त्याने हिंडणारे एक शिक्षक विलायतेहून आले असल्याचा आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न करतात' वगैरे प्रकारची चुरचुरीत व खरमरीत विनोदगर्भ टीका अच्युतरावांसह सर्वांवरच होती. कित्येक दिवस या टीकालेखाच्या लेखकाचा कोणाला मागमूस लागला नाही. पुढे बरेच दिवसांनी हा अच्युतरावांचाच पराक्रम होता ही गोष्ट लोकांना कळली.[३] ' मुंबईंत एकदां एका कीर्तनाला लावणीने सुरुवात व शेवट करून अशीच श्रोतृवर्गाची त्यांनी भंबेरी उडविली होती. 'थोडीशी चूकभूल करावयाची, त्याचा आनंद घ्यावयाचा आणि मग त्याचा स्फोट करावयाचा ही त्यांच्या स्वभावाची चुणूक पुढें 'संदेश' च्या रकान्यांतून आणि वक्तृत्वकलेंतून पराकोटीला पोंचलेली आढळून येते. 'पुणेरी जोडा' अशा प्रकारचें शीर्षक देऊन अच्युतरावांनीं 'जोडा' ह्या शब्दावर कसा कुशल कोटिक्रम लढविला आहे हें पाहाण्यासारखें आहे. 'वत्सलावहिनी' या टोपण नांवाने त्यांनी वृत्तपत्रसृष्टींत अशीच कुतूहलजनक खळबळ उडविली होती. त्यांच्या या अशा मिष्किलपणामुळें माधवाश्रमांत शिवाजी आल्याचें समजल्यानंतर जशी खळबळ उडा-

---

२. अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक प्रथम खंड, पृ. १८४.

३. बहुरूपी पृ. ४२–४३.



अनुक्रमणिका

त्याचें वर्णन आहे तशीच खळबळ त्यांनी अक्षरशः मवाळांच्या गोटांत उडविली आहे. परंतु ह्या मिष्किल व्यक्तिमत्त्वामागें अत्यंत उदात्त, ध्येयाकांक्षी व सुसंपन्न असें भावविश्व दडलेलें आहे हें विसरून चालणार नाहीं. अच्युतरावांचें सगळेंच लेखन निर्मत्सरी व खेळकर अशा देशभक्ति व देशाभिमानावर आधारीत आहे. त्यांना मिळमिळित, साधेंसुधें व हलकेंफुलकें असें फारसें आवडायचें नाहीं. छत्रपति शिवाजी महाराज रामदास व लो. टिळक यांच्यावर त्यांचें जें अलोट प्रेम आहे तें उगीच नव्हे. जीवनांत जें जें 'उत्कट आणि भव्य' आहे. त्याच्या प्राप्तीसाठी या त्रिमूर्तींनी जो देह कष्टविला त्याचेंच त्यांना अतिशय प्रेम आहे. जें जें भारतीय आणि विशेषतः महाराष्ट्राच्या अभिमानाचें आहे त्याचा अच्युतरावांना भारी सोस. शिवाजी, रामदास, टिळक यांना तर त्यांनी चिरंतन आदराने वंदन केलें आहे, परंतु न्या. रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, भांडारकर, शिवरामपंत परांजपे, गोखले, दाजीशास्त्री खरे यांसारख्या प्रत्येक कर्तृत्ववान पुरुषाचें त्यांनी गुणगान गाइलें आहे. पानिपतची शंभरी त्यांच्यांतील स्वातंत्र्यप्रेम उफाळून सोडते; तर दुसऱ्या बाजीरावाची दुर्दैवी कन्या कुसुमबाई हिच्या निधनाने अत्यंत करुण व अंतःकरणाला पाझर फोडील अशी ते दुःखाची तार छेडतात. लो. टिळकांचें अनुयायित्व पत्करून त्यांनी शिवरामपंतांप्रमाणें मवाळांना हैराण केलें आहे; परंतु त्यांच्या लेखनांत शिवरामपंतांप्रमाणे आत्यंतिक तुच्छता किंवा मनाची खोल अढी दिसून येणार नाहीं. 'सत्तेशिवाय जीवित व्यर्थ आहे', या लेखांत त्यांनी रँग्लर परांजपे यांना हास्यास्पद ठरविण्याचा प्रयत्न केला तरी इतरत्र त्यांनीं त्यांचा मनसोक्त गौरव केला आहे, फंडगुंड प्रकरणांत त्यांच्या लेखणीने ताळ सोडला आणि टिळकांच्यावर व केळकरांवर त्यांनी बेताल गरळ ओकलें. अर्थात् त्याचें प्रायश्चितहि त्यांना मिळालें. सार्वजनिक जीवनांत जनतेने त्यांना बाहेर तोंड दाखविण्यांस मनाई केली, इतका त्यांनीं त्यांचा रोष ओढवून घेतला; परंतु टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांनी एकट्याने एकटाकी पुस्तकाचीं सत्तर पानें भरतील इतका मजकूर एक प्रकारच्या समाधींत लिहून काढला आणि आपलें टिळकांवरचें अलोट प्रेम व्यक्त केलें. नरसिंह चिंतामण केळकरांवर खास 'केळकर गौरव अंक' काढून त्यांनीं अमाप स्तुतिसुमनें उधळलीं व 'दोन तात्या' या लेखाद्वारें त्यांना अविस्मरणीय केलें. 'पहिली रात्र', 'दुसरी रात्र', 'चोरून चुंबन', गुलाबी विधवा', 'विस्कटलेली वेणी' किंवा 'चोरी कशी करावी' अशा प्रकारचे आकर्षक मथळे देऊन लेख किंवा छोटेंसें पुस्तक प्रसिद्ध करावें. नांवावरून लोकांना तें रंगेल, रंगेल किंवा शृंगारिक वाटावें; परंतु लेखकाने मात्र त्यांच्या अवधानाची चोरी करून त्यांतून ध्येयवादित्वाचे स्वदेश, स्वभाषा, स्वधर्म यांच्या अभिमानाचे झलक दाखवावे हें नेहमींचेंच. राम, कृष्ण, शिवाजी, रामदास आणि टिळक यांच्याकडे पुरुषोत्तम म्हणूनच त्यांनी पाहिलें. त्या दृष्टीने अच्युतरावांची ही विभूतिपूजा अत्यंत कडवी होती. टिळकांवरील त्यांच्या नितान्त भक्तिमुळे त्यांच्या हयातींत व त्यांच्या मृत्यूनंतर जवळ जवळ २०-२५ वर्षें अच्युतरावांनी आपल्या वडिलांचें (वामनराव कोल्हटकरांचें) मवाळ व मिळमिळीत धोरण पसंत न पडल्यामुळे त्यांचें नांव टाकून देऊन पितृपदीं बळवंतरावांचें म्हणजे लोकमान्यांचें नांव लावलें, असा महाराष्ट्रांतील सगळ्यांचाच समज झाला होता. प्रा. श्री. म. माटे व चिंतामणराव कोल्हटकरांनी हा गैरसमज दूर केला. अच्युतराव वर्ष दीड वर्षाचे असतांनाच त्यांची मातोश्री निवर्तली व त्यांचे मोठे चुलते श्री. बळवंतराव कोल्हटकर यांनी त्यांचा मोठ्या कौतुकाने सांभाळ केला. लहानपणापासून शाळेंत अच्युतरावांचें नांव अच्युत बळवंत कोल्हटकर असें होतें. टिळकांशीं संबंध येण्यापूर्वी वयाच्या पंधराव्या वर्षी ते अच्युत बळवंत कोल्हटकर या नांवाने मॅट्रिक पास झाले होते. अच्युतरावांच्या कडव्या टिळकभक्तीनें महाराष्ट्राला जवळ जवळ ४० वर्षें कसें चकविलें होतें, हें यावरून लक्षांत येईल.

अच्युतरावांच्या तोफखानी लेखन-संभारांत त्यांनी लिहिलेलीं ११ प्रकाशित-अप्रकाशित नाटकें व ५ प्रकाशित-अप्रकाशित कादंबऱ्या ह्या विस्मरणाच्या गर्तेत गडप झाल्या. कारण वृत्तपत्रीय धावपळींत फारशा कलागुणांची बूज राखून अथवा त्यांतील तंत्रमंत्राचा बडिवार सांभाळून त्यांना हा वाङ्मयप्रपंच संभाळतां आला नाही आणि जीं कांहीं थोडीबहुत

नाटकें-कादंबऱ्या उपलब्ध आहेत त्यांचें वाचन केलें असतां खरे अच्युतराव त्यांमधून दिसत नाहीत असेंच म्हणावें लागतें. अच्युतरावांचें खरें दर्शन त्यांनीं वेळोवेळीं लिहिलेल्या लेखांतूनच होतें. त्यांतहि मिष्किल आणि खेळकर भूमिकेवरून जेथें ते लिहावयास बसतात, तेथें अच्युतरावांच्या लेखणीला निराळें तेज येतें.

एकंदरींत त्यांच्या लेखांचे तीन किंवा चार भाग करावे लागतात. त्यांतल्या त्यांत आध्यात्मिक, वेदान्तिक किंवा पौराणिक भूमिकेवरून लिहिलेल्या लेखांतून हिंदुधर्म व भारतीय परंपरा व प्रगति यांबद्दलचा त्यांचा अभिमान सारखा ओसंडत राहतो. वैचारिक भूमिकेवरून साध्या, सोप्या रीतीने अत्यंत गूढ किंवा क्लिष्ट विषय समजावून देऊन त्यांतल्या महत्त्वाच्या अंगावर प्रकाश पाडणें, हें अशा प्रकारच्या लेखांतून काम साधलेलें आहे. श्री. विष्णु सखाराम घाटे यांच्या 'भस्मासुर' या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेंतील कांहीं भाग 'हिंदुधर्म आणि स्वातंत्र्य' या लेखांत दिलेला आहे. त्या प्रस्तावनेवरून अच्युतरावांच्या अशा प्रकारच्या लेखांचें स्वरूप कळून येईल.

शिवाजी, रामदास, टिळक, आगरकर, चिपळूणकर, परांजपे यांच्याबद्दलचें मूल्यमापन आणि राष्ट्रकार्यामध्यें त्यांचें असलेलें अद्वितीय स्थान यांबद्दलचे अच्युतरावांचे विचार नंतरच्या लेखांतून दिसून येतील. इतर अनेक व्यक्तींबद्दलहि अच्युतरावांनी दाखविलेली गुणग्राहकता हा त्यांच्या दृष्टिकोनाचा महत्त्वाचा भाग होय. विशेषतः टिळकांच्या हयातींत आणि टिळकांच्या निधनानंतर महात्मा गांधींचें नेतृत्व महाराष्ट्राला पचण्यास जड गेलें. भारतांतील वृत्तपत्रांमध्यें आणि पुढाऱ्यांमध्यें महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांनी व पुढाऱ्यांनी महात्मा गांधींच्या कार्याकडे उपहासाने आणि उपेक्षेने पाहिलें. अच्युतरावांनी मात्र अगदी टिळकांच्या हयातीपासूनच महात्मा गांधींचें द्रष्टेपण ओळखून त्यांच्या एकंदर कार्याचें मूल्यमापन १९१८ पासूनच केलेलें आहे. टिळकांचें कार्य जेथून खुंटलें तेथूनच पुढें म. गांधींचें सुरू होतें, अशी आपली श्रद्धा त्यांनीं वारंवार संदेशामधून बोलून दाखविलेली आहे.

अच्युतरावांचे वाङ्मयीन लेख अतिशय मौलिक आहेत. विशेषतः 'मराठी काव्याची प्रभात' या त्यांच्या लेखांतून प्राचीन व अर्वाचीन कवितेच्या संदर्भांत त्यांनीं शाहिरी व लावणी वाङ्मयाचें मोठ्या मार्मिकतेने रसग्रहण केलें आहे. संतवाङ्मयाबद्दलचा त्यांचा दृष्टिकोन अत्यंत विचारप्रवर्तक व त्यांच्या वैशिष्ट्यावर अचूक बोट ठेवणारा आहे. विनायक लक्ष्मण भाव्यांसारख्या प्राचीन मराठी वाङ्मयाच्या चिकित्सक व रसिक अभ्यासकाने "जे टाळ कुटीत बसले आणि मृत अशा संस्कृताच्या छंदाला अनुसरून भारत रामायणांतल्याच कर्मकथांचीं पुराणें पुन्हा पुन्हा सांगत सुटले, जे श्लोक आर्यादिकांच्या उसन्या कसरतींत बांधले राहिले, त्यांना देश तरला काय आणि बुडला काय !! तो हसला काय आणि रडला काय !! एकच ! त्यांचीं तीं पुराणें संथपणें चालूच होतीं त्यांच्या वाग्देवीला सगळेच सारखे होते," अशा प्रकारचा त्यांचा अतिशयोक्त अधिक्षेप केला आहे. संतांच्या कार्याबद्दल अनेक प्रकारें चिखल उडविणारें विवेचनहि नंतरच्या काळांत निर्माण झालें आहे; परंतु कोल्हटकरांनी ह्याच संतांबद्दल किती गौरवयुक्त व अभिमानी उद्गार काढले आहेत ते पहा. "ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव अथवा तुकाराम ह्यांपैकीं कोणताहि कवि घ्या. ज्या दृष्टीने कवि काव्यें रचतात तशी दृष्टि एकाहि कवीची नव्हती. काव्यें रचण्यापेक्षा ह्या सर्व महापुरुषांचा फारच उदात्त उद्देश होता. त्यांना कालिदास म्हणवून घेण्याची मुळीच हाव नव्हती. ह्यांची मुख्य तृष्णा परमेश्वरानें आपणास आपले 'दास' म्हणावें एवढीच होती. त्यांना कालिदास म्हणून कोणी कितीहि मान दिला असता तथापि जर ईश्वराने त्यांना आपलें म्हटलें नसतें तर त्यांच्या मनाचें समाधान झालें नसतें. अशा थोर विभूतींना कवि म्हणणें ही एक प्रकारें त्यांची योग्यता कमी करण्यासारखेंच आहे. ते तत्त्वज्ञ, धर्मकर्ते व समाजोद्धारक होते. ते समाज-नियमनाची गंगा होते. त्या गंगेंत लोकांना आपलीं पातकें, आपलीं दुःखें, आपलें मनस्ताप बुडवून टाकण्याची परवानगी होती; परंतु आपली काव्यस्पृहाहि त्यांत खळबळून घ्यावी, इतक्या हीन प्रतीचे ते नव्हते."

अर्वाचीन कवितेसंबंधींचे त्यांचे उद्गार हे अधिक्षेपाचे निदर्शक नव्हेत. 'सत्य सदा बोलावें, सांगे गुरु आणि आपला बाप' अशा प्रकारची ही नीरस, निपट, निर्बुद्ध व कळकटलेली कविता खरोखरच 'हाडुक-

बहाद्दर ' या पदवीस पात्र होती. ' प्राचीन कवींच्या तुलनेने खरोखर अर्वाचीन कवींची स्फूर्ति म्हणजे विजेचें तळपणें अथवा काजव्याचें चमकणें होय ' या उद्गारांत चपखलपणे अर्वाचीन कवितेचें मर्म सांगितलेलें आहे. रे. टिळकांच्या कवितेवर लिहितांना देखील, ' आधुनिक कवितेचें एखादें लक्षण बांधावयाचें असेल तर तें गर्विष्ठपणाच्या मुद्द्यावर मात्र बांधतां येईल ' असें त्यांनी जें म्हटलें आहे, तें अतिशय अन्वर्थक आहे. कवींच्या सामर्थ्याबद्दल व कविप्रतिभेचें स्वरूप व कार्य यांवर पुढे मराठींत इतक्या मोठ्या प्रमाणांत पिंजण झालें आहे की, संत कवींची शालीनता आणि नम्रता आणि अर्वाचीन कवींचें औद्धत्य यांतला फरक आपल्या विनयशील संस्कृतीला अधिक जाणवणें अपरिहार्य होतें. ' उत्कट भव्य ' यापासून सर्वस्वीं अलिप्त असलेलें अर्वाचीन काव्य अच्युतरावांच्या उपहासाला पात्र होणें साहजिकच होतें; परंतु असें असूनहि अच्युतरावांची वाङ्मयीन दृष्टि दुराग्रहजन्य नव्हती, हें त्यांच्या रे. टिळकांच्या कवितेवरील लेखाने सिद्ध केलें आहे. ' टिळकांच्या कवितेंत सहजपणा, गोडी, सुलभता, मोकळेपणा, विषयानुवृत्तित्व हे गुण असतात, हें कोणीहि कबूल करील आणि ह्या गुणामुळे टिळकांची कविता जी जन्म पावली ती वरिष्ठ पदवीस पात्र होण्याकरितांच जन्म पावली असें कोणीहि म्हणेल ' हे त्यांचे उद्गार किती निराग्रही आहेत, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. ' महाराष्ट्र नाट्यकलेचा शृंगारसाज ' या लेखाद्वारें त्यांनी मराठी रंगभूमीचा जो आढावा घेतला आहे, त्या द्वारां मराठी रंगभूमीबद्दलचा त्यांचा अभिमान, त्यांचा व्यासंग व श्रेष्ठ टीकाकारांची त्यांची अचूक दृष्टि व्यक्त होते. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आणि खाडीलकर, गडकरी यांच्या नाट्य-कौशल्याचें त्यांचें विवेचन त्या काळामध्यें अपूर्व होतें यांत शंका नाहीं. अच्युतरावांनी ' नारिंगी निशाण ' नाटक मंडळी काढून अनेक नाटकें लिहिलीं. स्वतः रंगभूमीवर त्यांनी कामें केलीं आणि अनेक नाटक मंडळ्या त्यांनी जवळून पाहिल्या आणि ' संदेश ' मध्यें नाट्यकृति व प्रयोग यासंबंधीं प्रोत्साहनपर असे लेख लिहून रंगभूमीची अपूर्व सेवा केली. खडतर शिक्षेंतून सुटून आल्यानंतर














लो. टिळकांनी प्रथम किर्लोस्कर मंडळीचें कुशल विचारलें होतें. त्यांचा ह्या पट्टशिष्याने प्रथम ' संदेश ' मधून नाट्यवाङ्मयाबद्दल अपूर्व उत्साहाने रकानेच्या रकाने लिहून नट-नाटककारांना खांद्यावर नाचविलें. ' राक्षसी महत्त्वाकांक्षा ' ह्या नाट्यकृतीचें परीक्षण म्हणूनच अच्युतरावांना इतक्या सहजतेने, अधिकार-वाणीने करतां आलें.

अच्युतरावांच्या नावीन्यपूर्ण आणि चविष्ट लेखनाचे निरनिराळे पैलू पुढच्या लेखांतून आढळून येतील. चिपळूणकरांच्या राष्ट्रवादी परंपरेंतील लेखनांपैकी दैनिकासारख्या अत्यंत तापदायक वृत्तपत्राची धुरा वाहणारे अच्युतराव हे पहिले पाईक. दैनिकाचा प्रचंड व्याप सांभाळून अच्युतरावांच्या लेखणीने इतकी अमाप लोकप्रियता मिळविली आणि पैसे टाकून महाराष्ट्रांतल्या फुकटया व खाष्ट वाचकांना आपलें दैनिक विकत घ्यावयास लावलें, विरोधकांना चोरून वाचावयास लावलें व लो. टिळकांनाहि 'संदेश' वाचल्याविना चैन पडूं नये असा एक नवा विक्रम केला तो अशासारख्या कल्पक लेखन-सामर्थ्यावर.

अच्युतरावांसारखा कल्पक, प्रतिभावान् व विनोदी वक्ता महाराष्ट्रांत झाला नाही. तासनतास श्रोत्यांना हसवून ते बेजार करीत. वक्तृत्वकलेमध्यें प्रश्नांची फार मोठी मालिका उभी करून, श्रोत्यांची उत्सुकता शिगेस नेऊन, एखाद्या नकारात्मक वाक्याने स्फोट करून, वाचकांना विस्मयाचे धक्के देणें, हें त्यांचें प्रमुख वैशिष्ट्य होतें. भावनेची तार छेडीत छेडीत काव्यमय आर्त स्वरांत ते पाहतां पाहतां श्रोत्यांना स्वातंत्र्यविचारांनी बेहोष करून सोडीत. असें करतांना कधी प्रौढ, धीर-गंभीर, भारदस्त वाणीनें, कधी अनेक उपमा-दृष्टान्तांच्या चौफेर कारंज्यांनी तर कधी एखाद्या अत्यंत प्रचलित अशा इंग्रजी शब्दाच्या उपयोगाने ते एकदम श्रोत्यांच्या अवधानाचा कबजा घेत. हीं सर्व वैशिष्ट्यें मोठया प्रमाणांत त्यांच्या या लेखनांतूनहि व्यक्त झालेलीं दिसतील.

तीक्ष्ण बुद्धिमत्ता, गाढ व्यासंग आणि सहज सुबोध अशा तऱ्हेची भाषा यांमुळेच अच्युतरावांना हें शक्य झालें. अच्युतरावांनी लेखणीने आपल्या वाणीचेहि बरेच गुण हस्तगत केले होते.

वैचारिकदृष्टया शिवरामपंतांनी काय किंवा अच्युतरावांनी काय, फारसें गहन, गूढ असें वाचकांच्या गळीं बांधलें नाही. वृत्तपत्रासारख्या लोकरंजनाचें वाण पत्करलेल्या नियतकालिकांतून अशा प्रकारच्या लेखनाला वावहि नव्हता आणि तशा प्रकारची बैठक मारण्यास कालावधीहि नव्हता. अलंकारिकता आणि माधुर्य, सहेतुक कलात्मकता किंवा कलाकुसर, कल्पनाचमत्कृती व वैचित्र्य, पांडित्य, आणि मिष्किलपणा, भावनेला चटकन् आवाहन करणारे, बुद्धीला पटकन गुंगविणारे यांसारख्या अनेक गुणांनीं युक्त असलेल्या स्वैर निबंधांतून ' ध्येयात्मकता आणि देशाभिमाना '-सारख्या गोष्टी अच्युत बळवंतांच्या लेखांनीं जनसमुदायास शिकविल्या. तेल्यातांबोळयांचे पुढारी म्हणून सार्थ ठरलेल्या लोकमान्यांच्या या अनुयायाने तेल्या-तांबोळयांपर्यंत ' संदेश ' पोंचविला. चटकदार, चतुर, चतुरस्त्र गुणांनी युक्त असलेलीं, चलाख, चपखल, चेष्टेखोर आणि लेखणीच्या चंचलतेचे विविध गुण दाखविणारीं, अशा प्रकारचीं ' च 'कारी सगळीं विशेषणें फक्त अच्युतरावांच्या निबंधांसच लावतां येतील. आजच्या लघु-निबंधांतील अनेक गुणांनीं तीं युक्त आहेत आणि त्याहिपेक्षां अधिक कितीतरी वैशिष्ट्यें त्यांत असल्यामुळें शिक्षणखात्यापेक्षां अच्युतरावांच्या लेखणीनेच त्याकाळीं अधिक साक्षरता-प्रसार केला, असे उद्गार निघाले. अच्युतरावांच्या सर्व गुणावगुणांनी युक्त असलेला, आचार्य अत्र्यांसारखा महान पत्रकार अच्युतरावांच्या लेखणीने निर्माण केला, यांतच अच्युतरावांच्या प्रतिभेचें श्रेष्ठत्व सिद्ध होतें.

चिपळूणकर, आगरकर, परांजपे इत्यादिकांचें निबंध-वाङ्मय या ना त्या तऱ्हेने शालेय व विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांपुढे सतत येत राहिलें; परंतु मराठी गद्याच्या विकासांतील अत्यंत महत्त्वाचा टप्पा असलेलें अच्युतरावांचें लेखन मात्र विद्यार्थ्यांना हव्या त्या स्वरूपांत आतांपर्यंत उपलब्ध होऊं शकलें नाहीं. अच्युत-वाङ्मयाचे परमभक्त श्री. अनंत हरी गद्रे यांनी मोठया परिश्रमाने प्रसिद्ध केलल्या त्यांच्या वाङ्मयाच्या तिन्ही खंडांतून निवडक आणि प्रातिनिधिक अशा ह्या संग्रहाने ही गरज थोडक्या प्रमाणांत का होईना भागूं शकेल असा विश्वास वाटतो.



अनुक्रमणिका






थिओडोर ड्रेपर : अनु. अशोक शहाणे

# कॅस्ट्रो आणि क्यूबांतील विश्वासघातकी क्रांति

[ थिओडोर ड्रेपरनें गेलीं पंचवीस वर्षें वृत्तपत्रकार, इतिहासकार व संपादक म्हणून नांव मिळवलें आहे. आंतरराष्ट्रीय राजकारण व अमेरिकन परराष्ट्रीय धोरण हे त्यांचे खास विषय. अमेरिकन श्रमिक चळवळ व अमेरिकन कम्युनिस्ट चळवळ ह्या क्षेत्रांतील त्यांचें संशोधन उल्लेखनीय आहे. The Six Weeks' War, The Battle of Germany, The Roots of American communism आणि American communism & Soviet Russia हीं त्यांचीं चार पुस्तकें.

क्यूबन क्रांतीवरील हा लेख The New Leader च्या २७ मार्च १९६१ च्या अंकावरून घेतला आहे ]

कॅस्ट्रो कोण आहे ? अधिकारारूढ होऊन दोन वर्षे होऊन गेल्यावरहि तो अद्याप आपल्या समर्थकांना व विरोधकांना हुलकावणी देत आहे. अधिकारावर आल्यावर पहिले कांहीं महिने कॅस्ट्रो ' मानवतावादा'चें नांव घेत असे. ' स्वातंत्र्य – भीतिविना नि भाकरीसह ' अशी तो आपल्या मानवतावादाची व्याख्या करीत असे. आतां ही व्याख्या म्हणजे कांहीं एखादा राजकीय व सामाजिक कार्यक्रम नव्हे. परंतु त्याबाबत कांहीं वेळां प्रयत्न करून त्यानें आणखीच संदिग्ध सूत्रांचा अवलंब केला. ' तुम्ही कशा प्रकारचा समाज उभारत आहांत ' किंवा ' ह्या समाजाचें वर्णन कसें करतां येईल ' असे प्रश्न त्याला व त्याच्या सहकाऱ्यांना विचारल्यावर, " आम्ही एक ' वास्तवता ' उभी करीत आहोंत, ' सिद्धांत ' नव्हे " असें उत्तर ते सामान्यतः देत असत; किंवा " आम्हांला ' प्रत्यक्ष कार्यांत ' रस आहे, ' निव्वळ शब्दांत ' नव्हे " किंवा " आमची क्रांति ' खास क्यूबन ' आहे " अशीं उत्तरें मिळत. ह्यापेक्षां अधिक निश्चित असें कांहीं सांगण्याची कॅस्ट्रोची आजहि तयारी नाहीं; आणि जोंपर्यंत तो ही जबाबदारी अंगावर घेत नाहीं, तोंपर्यंत हा प्रश्न तसाच अनुत्तरित राहतो.

गेल्या ऑगस्टमध्यें हॅवाना येथें भरलेल्या युवक-मेळाव्यांत मात्र क्यूबाच्या राष्ट्रीय बँकेचे माजी अध्यक्ष व सध्याचे उद्योगमंत्री श्री. अर्नेस्टो ग्वव्हॅरा -- जे आपली सही निव्वळ ' che' ' अशी करतात, — हें त्यांचें टोपणनांव आहे -- यांनीं चालू राजवटीला नांव व मतवादाचा आधार देण्यांत बरीच प्रगति केली. ग्वव्हॅरा हे कॅस्ट्रोच्या राजवटीचे तात्त्विक प्रवक्ते असल्यानें, कॅस्ट्रो जें उद्यां म्हणेल तें आज म्हणून टाकण्याची त्यांना संवय आहे. ' आपला मतवाद कोणता ? आपली क्रांति ही साम्यवादी क्रांति आहे का ? ' ह्या प्रश्नाला माझें उत्तर असें आहे, कीं आपली क्रांति ही मार्क्सवादी क्रांति आहे. मार्क्सनें निर्देशिलेले मार्ग व पद्धतीच आपण शोधून काढल्या आहेत. Verdo Olivo ह्या नियतकालिकाच्या गेल्या आक्टोबर महिन्याच्या अंकांत ' क्यूबांतील क्रांतीच्या मतवादाच्या अभ्यासाकरितां टीपा ' ह्या आपल्या लेखांत " ह्या क्रांतीच्या प्रमुख सूत्रधारांजवळ सुसंगत तात्त्विक कसोट्या नाहींत; परंतु आज जगांत चर्चिल्या जाणाऱ्या इतिहास, समाज, अर्थव्यवस्था आणि क्रांति यांच्या विविध कल्पनांचें अज्ञान त्यांना होतें, असें मात्र म्हणतां येणार नाहीं ", असें श्री. ग्वव्हॅरा यांनीं लिहिलें आहे. नंतर त्यांनीं अशीहि घोषणा केली आहे, कीं 'आम्ही व्यवहारी क्रांतिकारक आहोंत, आम्ही स्वतःच आमच्या ह्या झगड्याला सुरवात केली आहे. आणि असें करतांना, शास्त्रज्ञ म्हणून मार्क्सनें उद्घोषिलेल्या नियमांचीच केवळ परिपूर्ति आम्ही करीत आहोंत.

उत्तर देण्याची हूल ह्यांत आहे, परंतु त्यामुळेंच वास्तविक अधिक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होतात. आपला मतवाद ' मार्क्सवादी ' होता, परंतु साम्यवादी नव्हता, असें तर त्यांना सुचवायचें नसेल ? हा ' मार्क्सवाद ' कोणता ? साम्यवाद्यांचा कीं आणखी












कोणता तरी ? परत एकदां पृथ्वीच्या गोलाईचा प्रत्यय येणाऱ्या भाबड्या परंतु हुषार मुलांप्रमाणें कॅस्त्रो, ग्व्हॅरा आणि इतर लोकांना खरोखरींच ह्याचा शोध लागला कीं काय ? आपण काय करीत आहोंत, याचा पत्ता तें कार्य संपेपर्यंत न लागणाऱ्या क्रांतिकारकांकडून ' शास्त्रज्ञ असलेल्या मार्क्सच्या ' इतरत्र परिपूर्ति न लाभलेल्या ' नियमां 'ची परिपूर्ति लहानशा क्यूबा बेटांत होणें शक्य आहे का ?

अर्थातच ग्व्हॅरांच्या ह्या स्पष्टीकरणानें एकतर फारच कमी वा फारच जास्ती गोष्टी स्पष्ट होत असल्या पाहिजेत. परंतु कांहीं थोडक्या निवडक लोकांपाशीं कॅस्त्रो, ग्व्हॅरा व क्यूबांतील इतर नेते अधिक मोकळेपणानें आणि सविस्तरपणें बोलले आहेत. हे थोडके निवडक लोक परदेशांत त्यांचे भाष्यकार आणि apologists बनले आहेत. पण ह्या वाढत्या टोळीला हें काम कांहीं सहजपणें करतां आलेलें नाहीं. क्यूबांतील लोकांनीं टाळलेलें बरेंचसें सिद्धांतीकरण त्यांना करावें लागलें आहे. प्रत्येकच क्रांतीनें, कांहीं काळ लोटल्यानंतर, स्वतःच्या भाकडकथा रचल्या आहेत; परंतु ह्या क्रांतीच्या बाबत तसें घडलेलें नाहीं. अगोदरच असलेली भाकडकथा सांगायचें सोडून क्रांतीच्या परदेशी सहानुभावकांना स्वतःचीच भाकडकथा रचावी लागली आहे. ह्या सहानुभावकांपैकीं प्रत्येकानें मूळ भाकडकथेला स्वतःचें वैशिष्ट्यपूर्ण दान दिलें आहे. त्यामुळें, आणखी कांहीं नाहीं तरी, कॅस्त्रोविषयीं जवळीक वाटणारे कॅस्त्रोला काय रूप देतात, तें आपल्याला कळतें. ही परिस्थिति निःसंशय चमत्कारिक आहे,– पण तसें पाहिलें तर क्युबांतील क्रांतीच चमत्कारिक आहे.

**भाकडकथाकार**

कॅस्त्रोची ' शेतकऱ्यांची क्रांति ' ही सर्वांत पहिली नि आवडती भाकडकथा.

१९६० चा मार्च महिना क्यूबांत काढल्यानंतर जाँ–पोल सार्त्र व सिमोने द् बोव्हा या दोन फ्रेंच लेखकांनीं दिलेल्या मुलाखतींतून व लिहिलेल्या लेखांतून ह्या भाकडकथेनें जन्म घेतला. नेहमींचा घाईघाईनें केलेला तोकडा फेरफटका आणि लांबलचक संभाषणानंतर सार्त्रनें France–soir मध्यें सोळा लेखांची एक माला लिहिली. त्रिन्यांप्रमाणेंच क्यूबन लोकांनींहि आपल्या देशांत ' शेतकऱ्यांची क्रांति ' कशी घडवून आणली आहे, याची माहिती क्यूबन लोकांना आपण दिल्याचें त्यानें एका लेखांत सांगितलें आहे. यावरील क्यूबन प्रतिक्रिया दुहेरी होती, अशी नोंद त्यानें केली आहे : डोंगरखोऱ्यांतून लढलेले ' दाढीवाले ' त्यांच्याशीं सहमत होते; प्रतिरोधक चळवळी करून शहरांतून लढा दिलेल्या ' बिगर दाढीवाल्यां'चें असें म्हणणें होतें, कीं शेतकऱ्यांनीं लढ्यांत फारच थोडा व असमाधानकारक भाग घेतला आणि क्रांतीनें शहरांतून उठाव केला.

श्रीमती द् बोव्हा यांनीं France-observateur ला दिलेल्या मुलाखतींत थोडी वेगळी कहाणी सांगितली आहे. पेटी-बूर्झ्वा लोकांनीं शहरांत क्रांतीला आरंभ केला आणि शेतकरी त्यापासून दूर राहिले; नंतर हलकें-हलकें शेतकरीहि सहभागी झाले. विजयी क्रांतीचीं तांतडीचीं उद्दिष्टें हीं शेतकरी-वर्गाचींहि बनून गेलीं; आणि त्यामुळें " आरंभ कोठेंहि झाला असला, तरी नागरी क्रांतीलाच आपण शेतकऱ्यांची क्रांति असें म्हणू शकतों. "

परंतु, एक सर्वांग-परिपूर्ण सिद्धांत म्हणून क्यूबन शेतकऱ्यांच्या क्रांतीनें दर्शन दिलें, तें लिओ हबरमन व पॉल एम्. स्वीझी या Monthly Review च्या संपादक-द्वयानें लिहिलेल्या Cuba, Anatomy of a Revolution या पुस्तकांत. सबंध शेतकरी–वर्गानें क्रांतीत सक्रिय भाग घेतल्यामुळें व तो ' क्रांतिकारक सैन्याशीं एकाकार' झाल्यामुळेंच क्रांति यशस्वी झाली,– तीन आठवडे क्यूबांत राहिल्यावर त्यांना असें वाटलें. 'क्रांतिकारक इच्छाशक्तीचें व शेतकरी–वर्गाच्या बलवत्तेचें मूर्तिमंत रूप ' असें कॅस्त्रोचें दर्शन त्यांना घडलें. ह्या शेतकऱ्यांच्या क्रांतीनें निर्माण केलेल्या राजवटीबाबतहि त्यांचें ' निःसंदिग्ध उत्तर ' असें आहे : नवा क्यूबा हा समाजवादी क्यूबा आहे.

सहा महिन्यांच्या कालावधीनंतर तीन आठवड्यांची आणखी एक फेरी त्यांनीं क्यूबाला टाकली. एव्हांना कॅस्त्रोच्या राजवटीनें क्यूबन अर्थव्यवस्थेच्या बऱ्याचशा क्षेत्राचें राष्ट्रीयीकरण केलें होतें. ह्या नव्या प्रकारामुळें त्यांना आपला जुना अंदाज बदलावा लागला.








आतां क्यूबन क्रांति ही 'मूलतः शेतकऱ्यांची क्रांति' नव्हती, कारण कामगार वर्गहि शेवटीं त्यांत 'ओढला' गेला होता. स्वतःला 'मार्क्सवादी' म्हणवून घेण्यापर्यंत अद्याप कॅस्त्रोची मजल गेली नव्हती; परंतु "खुद्द मार्क्सलाहि 'हा आपला शिष्य आहे' असें म्हणण्यांत अभिमानच वाटला असता" अशा रीतीनें स्वतःच्या 'संपन्न अनुभवानें' व 'तीक्ष्ण व तल्लख बुद्धीनें' 'अचूक मार्क्सवादी' बनल्याचा मानहि ह्या दोन पाहुण्यांनीं कॅस्त्रोला बहाल केला. शिवाय पहिल्या फेरींत क्यूबा हें समाजवादी राष्ट्र असल्याचा उल्लेख त्यांच्यापाशीं कोणींच केला नसला, क्रांतीच्या अंतिम उद्दिष्टांच्या यादींतहि समाजवादाचा अंतर्भाव झालेला नसला, आणि कॅस्त्रो अतिशय 'नम्र' असला तरी समाजवादी क्यूबाबद्दल इतकें कांहीं त्यांच्या कानांवर आलें, कीं ती एक 'प्रचलित' गोष्ट झाली होती.

अशा रीतीनें १९६० सालच्या वसंत ऋतूंत समाजवादाकडे नेणाऱ्या एका नवीन मार्गाचा शोध लागला. श्रीमंत जमीनदाराच्या मध्यमवर्गीय मुलानें नेतृत्व केलेली शेतकऱ्यांची क्रांति. आणि १९६० सालाच्या शेवटास, क्यूबांतील क्रांति समाजवादी क्रांति होती, हा विश्वास दृढ झाला; कारण शेवटीं कामगारवर्गहि क्रांतींत ओढला गेला होता.[१]

कॅस्त्रोविषयीं सहानुभूति असणाऱ्या बाकीच्या लोकांनीं तर याहि पुढें मजल मारली आहे. New states-man साप्ताहिकाच्या श्री. पॉल जॉनसन यांनीं क्यूबाकडे एकच दृष्टिक्षेप टाकून असें जाहीर केलें, कीं कॅस्त्रो 'शेतकऱ्यांच्या क्रांती'मुळें अधिकारारूढ झाला आहे, परंतु एका माणसाच्या 'निःसंबद्ध' सत्तेंत आविष्कार झालेल्या 'जनतेच्या अस्सल हुकुमशाहीनें' तो राज्य चालवीत आहे. कॅस्त्रोचे अमेरिकन पुरस्कर्ते प्रा. सॅम्युअल शापिरो यांनीं New Republic मध्यें 'जमीन सुधारणा हा क्रांतीचा गाभा सारतः मार्क्सवादी आहे' एवढ्यावरच आपलें म्हणणें आटोपलें. आणि कोलंबिया विद्यापीठाच्या श्री. सी. राइट मिल्स यांनीं गेल्या ऑगस्ट पर्यंत कॅस्त्रो व त्याच्या सहकाऱ्यांच्या स्वतः-विषयींच्या निवेदनाची एक जंत्रीच तयार केली.

प्रा. मिल्स यांचें नुक्तेंच प्रसिद्ध झालेलें Listen, yankee! हें पुस्तक 'क्यूबन क्रांतिकारकाचा आवाज आहे' (पुस्तकाच्या लेखकाचा नव्हे) असें ग्रंथ-कर्त्याचेंच म्हणणें आहे. गेल्या एप्रिलमध्यें क्यूबांत मी ज्यांच्या-ज्यांच्याशीं बोललों, त्यावरून क्यूबांतील पुढारी लोक मिल्सनें लिहिल्या प्रमाणेंच बोलतात, अशी हमी मी देऊं शकतों. कित्येक वेळां तर पुस्तकांतील शब्द मीं ऐकलेल्या बोलण्याला इतके जवळचे होते, कीं आतां आपल्याला ऋषीचें कूळ सांपडलें, असें मला वाटलें. हें जितकें खरें असेल, तितक्या प्रमाणांत मिल्सनीं स्वतःला विशुद्ध व अमिश्र प्रचाराचें वाहन बनवलें आहे; इतरांनीं असें केलेलें नाहीं. तेहि जवळ-पास त्याच लोकांशीं बोलले, परंतु त्यांना जें सांगितलें गेलें, तें त्यांनीं आपल्या नांवावर छापलें.

परंतु तरी पुस्तकाचा लेखक म्हणून मिल्सनीं स्वतः-चेंच नांव घातलें आहे, आणि शेवटच्या कांहीं थोडक्या पानांत त्यांनीं कॅस्त्रोच्या ह्या प्रकरणाला स्वतःचा पुरस्कार जोडला आहे. एकाच पक्षाचें म्हणणें ऐकण्यापेक्षां अधिक कांहीं श्रम लेखकानें करावेत, आणि समाजशास्त्रज्ञाला एखाद्या देशाच्या सामाजिक परिस्थितिबद्दल बऱ्याचशा प्रमाणांत अचूक रिपोर्ट देतां यावा, अशी अपेक्षा बाळगण्याचा अधिकार वाचकाला आहे. शिरा ताणून केलेला प्रचार जितका प्रामाणिक वा अप्रामाणिक असेल, तितकें प्रामाणिक वा अप्रामा-णिक हें पुस्तक आहे. आणि कॅस्त्रोच्या प्रचार-यंत्रणेंतील

१. शेतकऱ्यांविषयींच्या मजकुराच्या तुलनेनें, कामगार-वर्गाविषयींच्या मजकुराला ह्युबरमन आणि स्वीझी यांनीं एका पानापेक्षांहि कमी जागा दिली आहे. आणि वस्तुस्थितीचा विपर्यास करून, १९५९ पूर्वी क्रांतीला कामगार-वर्गाचा खूपच पाठिंबा होता, असें त्यांनीं अस्पष्टपणें सूचित केलें आहे. पुस्तकांत अन्यत्र आलेल्या एका वाक्यांशांत मात्र कॅस्त्रोला 'कामगार-वर्गांतून वाढता पाठिंबा' तो सत्तारूढ झाल्यावर मग मिळाला, अशी कबूली त्यांनीं दिली आहे. Monthly Review डिसेंबर १९६० च्या अंकांत लिहिलेल्या लेखांत 'चालू उन्हाळ्यांत व हिवाळ्यांत घडून आलेल्या राष्ट्रीयीकरणामुळें कामगार-वर्ग क्रांतीच्या प्रक्रियेंत लोटला गेला आहे' असें विधान करून, त्यांनीं क्यूबन कामगार 'मागासलेले' होते असें सूचित केलें आहे.



अनुक्रमणिका








विनीचा वीर होण्याचाच मिल्सनें प्रयत्न केला असेल, तर तो पूर्णपणें यशस्वी झाला आहे. परंतु सी. राइट मिल्स यांच्याकडून आपण फक्त एवढीच अपेक्षा ठेवावी काय ?

मिल्सचे क्यूबन नागरिक – ते कोठें संपतात आणि मिल्ससाहेब कोठें सुरू होतात, याचा आपल्याला कधींच पत्ता लागत नाहीं. क्यूबन क्रांति काय नव्हती, तें मिल्स प्रथम आपल्याला सांगतात — " शेतकरी व जमीनदार, कामगार व भांडवलदार यांच्यांतील झगडा – अशी ही क्रांति नव्हती; किंवा क्यूबन लोक व परकीय लोक यांचें सरळसरळ राष्ट्रवादी युद्ध – अशी ही क्रांति नव्हती. " ती कांहीं ' आर्थिक परिस्थितीनें लादलेली ' क्रांति नव्हती. ' क्रांतीचीं मुळें वा तिचा उद्गम तेथें नव्हता. ' ' किंवा शहरांतील श्रमिक संघटना वा कामगार, किंवा श्रमिक पक्ष किंवा त्यासारखें कांहींहि यांनीं केलेली ती क्रांति नव्हती. ' मग ती होती तरी काय ? ' हवाना विद्यापीठांतील तरुण व बुद्धिजीवी विद्यार्थी हे तिचे नेते होते; ' आरंभीं दीर्घ काळपर्यंत हालचाली करणारे व नंतर त्या यशस्वी करणारे कांहीं मध्यमवर्गीय विद्यार्थी व बुद्धिजीवी, – असेंहि त्यांचें वर्णन केलें गेलें आहे. या हालचालींत जेव्हां ' ह्या बुद्धिजीवी तरुणांतील मूठभर मंडळी जेव्हां खरोखरी शेतकऱ्यांना आपल्यांत सामावून घेऊं शकली ', तेव्हांच क्रांतीला ' खरी सुरवात ' झाली.

म्हणजे मिल्सच्या ह्या कहाणींत ' शेतकऱ्यांच्या क्रांती 'बाबतचा बाष्कळपणा नाहीं. आरंभींच्या काळांत निर्णायक शक्ति बुद्धिजीवी व शेतकऱ्यांची होती, व नेतृत्व संपूर्णपणें बुद्धिजीवी मंडळींच्या हातीं होतें, एवढेंच फक्त ही कहाणी सांगते. कामगारांनीं क्रांति केली इत्यादि मूर्खपणाहि ह्यांत नाहीं; विजयानंतर ते क्रांतिकारी गटाला येऊन मिळाले व त्यांची ' क्रांतीची जाणीव ' फक्त गेल्या थोडक्या महिन्यांतच जागी झाल्याचें सांगितलें आहे. परंतु वृत्तांत येथपर्यंत आला कीं मग भाकडकथा आपला वरचष्मा गाजवते आणि मग एक क्रांतिकारक शक्ति म्हणून कामगारांनीं शेतकऱ्यांनाहि मागें टाकल्याच्या गोष्टी मिल्स बोलूं लागतात. परंतु सर्वांत बाष्कळ लिखाण मध्यमवर्गाबद्दलचें आहे. मूळचे ' मूठभर ' नेते अर्थातच या वर्गांतलेच होते. परंतु भाकडकथा उभी करायची तर ' आरंभींच्या काळीं मध्यमवर्गानें, सामान्यपणें निदान निष्क्रियपणें तरी क्रांतीला पाठिंबा दिला; परंतु एक वर्ग म्हणून त्याचा क्रांतीशीं फारच कमी संबंध होता ' असें असायला हवें. बहुसंख्य मध्यमवर्गीयांनीं क्रांतीला निष्क्रिय पाठिंबा दिला, किंवा मुळींच दिला नाहीं, असा याचा अर्थ होतो.

कॅस्त्रो-गटानें केलेल्या बऱ्याच कार्यक्रमविषयक घोषणाहि मिल्सनीं एकत्रित केल्या आहेत. स्पष्ट असें कांहींहि आपल्या माथीं मारून घ्यायची तयारी अद्यापहि नाहींच; कारण विशिष्ट ' राजकीय प्रणाली ' नेत्यांच्या मार्गांत अडथळे आणेल, आणि फारच थोड्या लोकांना त्याचें सोयर सुतक वाटत असेल, किंवा कांहींहि प्रणाली नसणें हाच लोकशाही असल्याचा पुरावा असेल. परंतु हाहि उद्देश हलकेंच दुसऱ्या एका उद्देशावर घसरतो. ' आम्ही ज्याची उभारणी करीत आहोंत, त्याला काय म्हणावें, हें आम्हांलाच नीटसें कळत नाहीं, आणि आम्हांला त्याची कांहींच पर्वा नाहीं. तरी अर्थात् तो एक प्रकारचा समाजवादच आहे. ' किंवा मग प्रणाली कांहींहि असो, ती क्युबाच्या नागरिकांनीं स्वतःच शोधून काढली आहे. " आमच्या क्रांतिकारक विकासांत व विचारांत आम्ही मार्क्सवादी किंवा डाव्या गटाचे ( किंवा साम्यवादी कां म्हणानात ) असूं, तर तें आमच्या मतवादांत आम्ही आधीं पासूनच बांधलों गेलों होतों त्यामुळें नव्हे. आमचा स्वतःचा विकासच तसा झाला, हेंच त्याचें कारण आहे. " आणखीहि कांहीं पानें मागें पडल्यावर कॅस्त्रोचा क्यूबा ही एक ' क्यूबाच्या शेतकरी कामकऱ्यांची, त्यांच्याच करितां आणि त्यांनींच चालवलेली हुकुमशाही राजवट ' किंवा ' लोकांची हुकुमशाही ' बनते. कॅस्त्रोची राजवट म्हणजे एकाच माणसाला ' प्रत्यक्षांत अनिर्बंध सत्ता ' असलेली ' क्यूबाच्या शेतकरी-कामकऱ्यांची क्रांतिकारक हुकूमशाही ' असें खुद्द मिल्ससाहेबांचें मत आहे.

सार्त्र आणि द् बोव्हा, हारमन आणि स्वीझी, जॉनसन आणि शापिरो, मिल्ससाहेबांचे क्यूबन्स आणि मिल्ससाहेब, ह्या सर्वांचेच हे सगळे सिद्धांत खरे असूं शकणार नाहींत, तरी एक गोष्ट त्यांच्यांत समाईक








आहे -- ती ही, कीं क्यूबांतील क्रांति ही मध्यमवर्गानें केलेली क्रांति असून, तिचा उपयोग मध्यमवर्गाचा नाश करण्याकरितां करण्यांत आला,- ही वस्तुस्थिति लपवण्याचें कार्य हे सर्व सिद्धांत करतात आणि हा विरोधाभास समजून घेतल्याशिवाय कॅस्त्रोच्या क्यूबांतील समाजरचनेची नीटशी कल्पना येऊंच शकणार नाहीं.

## दहशत आणि प्रतिदहशत

आतां आरंभीच एक प्रश्न : कॅस्त्रोच्या ' शेतकऱ्यांच्या क्रांतीं 'त कितपत तथ्य आहे ? १९५६ च्या डिसेंबरमध्यें कॅस्त्रोबरोबर मेक्सिकोंतून क्यूबांत घुसणारीं ८२ माणसें व त्यांतून वांचून नंतर सिएरा मैस्त्रा ह्या क्यूबाच्या पूर्वेकडील टोकाच्या डोंगराळ प्रदेशांत लढा देणारीं १२ माणसें, हीं सर्व मध्यम वर्गांतलीं होतीं. स्वतः कॅस्त्रो हाच त्यांचा आदर्श प्रतिनिधि होता – श्रीमंत जमीनदाराचा मुलगा, पदवीधर, वकील. Guajiros किंवा डोंगराळ मुलखांतले शेतकरी त्यांच्यापैकीं बहुतेकांना पूर्णपणें परकी होते. परंतु हुकुमशहा बॅटिस्टाच्या हेरांपासून व सैनिकांपासून संरक्षण मिळवण्याकरितां, तसेंच क्रांतिकारक गटांत नवी भरती करण्याकरितां, शिवाय पोटाला अन्न मिळावें म्हणून ह्या शेतकऱ्यांचा विश्वास संपादन करण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हतें. महिन्या मागून महिने उलटले आणि शेतकरी व क्रांतिकारक यांच्यांतील संबंधानें एक नवें रूप धारण केलें. वाळींत टाकलेल्या शेतकऱ्यांचें अठरा-विश्वें दारिद्र्य, त्यांच्यांतील निरक्षरता, रोगराई व अडाणीपणा पाहून शहरांत वाढलेल्या त्या अल्पवयीन माजी विद्यार्थ्यांना धक्काच बसला. ह्या अंशतः वास्तव व अंशतः आवेगपूर्ण अनुभवांतून, अंत्य व अतिशय दुर्लक्षित अशा समाजाच्या अंशाला निरामयतेच्या आणि मानवी प्रतिष्ठेच्या सुसंस्कृत पातळीवर नेऊन, क्यूबन समाजांत क्रांति घडवून आणण्याच्या निर्धारानें जन्म घेतला.

तरी एक वर्षापेक्षांहि अधिक काळपर्यंत कॅस्त्रोची लढाऊ कुमक इतकी थोडी होती, कीं त्या डोंगराळ मुलखांतून बॅटिस्टाची सत्ता झुगारून देण्याची अपेक्षा त्यानेंहि बाळगली नाहीं[२]. शहरांतून झालेल्या अतिशय मोठ्या प्रमाणावरील प्रतिकार चळवळीमुळेंच विजयाची आशा बाळगली गेली. आणि ह्या चळवळींत बहुसंख्येनें मध्यम-वर्गीय नागरीकच होते. ९ एप्रिल १९५८ रोजीं करण्यांत आलेल्या अपेशी संपामागें ह्या चळवळीवरून बांधलेले हिशेबच होते[३]. मध्यमवर्गीय नागरिक संप नीट पाळूं शकले नाहींत, म्हणून ह्या संपाला अपयश आलें. हें काम फक्त कामगार व त्यांच्या संघटनाच करूं शकल्या असत्या. दोन कारणांस्तव त्यांनीं सहकार्य देण्याचें नाकारलें: एकतर बॅटिस्टांच्या राजवटींत कामगार सुखी होते, आणि दुसरें म्हणजे क्यूबांतील साम्यवाद्यांनीं मुद्दामच संप फोडला – कारण संपाबाबत त्यांचा सल्ला विचारण्यांत आला नव्हता आणि पूर्वींच त्यांच्याशीं याबाबत करारनामा करून घेतला नव्हता. साम्यवादी नेतृत्वाखालीं असलेले वाहतुक कामगार संपांत नाहींत, म्हणजे संपाचा निकाल आधींच लागल्यासारखा झाला होता. गेल्या

---

२. Council of Liberation म्हणून संबोधल्या जाणाऱ्या समितीला ३१ डिसेंबर १९५७ रोजीं लिहिलेल्या पत्रांत स्वतः कॅस्त्रोनेंच आपल्या एकाकी व प्रायः- निराश स्थितीचें वर्णन केलें आहे : ' For those who are fighting against an army incomparable in number and in arms, without any support during a whole year other than the dignity with which we are fighting for a cause which we love sincerely and the coviction that it is worth-while to die for it, bitterly forgotten by fellow-countrymen who, in spite of having all the ways and means, have systematically ( not to say criminally ) denied us their help ...... ' हें सबंध पत्र श्री. Jules Dubois यांच्या Fidel Castro ह्या पुस्तकांत आलें आहे. हें पुस्तक आजपर्यंतच्या पुस्तकांत सर्वांत अधिक विश्वासार्ह माहिती पुरवणारें आहे. तें जरी कॅस्त्रोच्या बाजूला झुकत असलें, तरी Jules Dubois नें त्याबद्दल खेद व्यक्त करून हा आरोप नाकारला आहे.

३. १२ मार्च १९५८ च्या कॅस्त्रोच्या जाहिरनाम्यांतील दुसरें कलम असें होतें : ' अंतिम हल्ल्याची योजना सार्वत्रिक संपाच्या आधारें ठरवावी. लष्करी मोहिम नंतर करावी. '



अनुक्रमणिका







युद्धापासून Partido Socialista Popular या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या कम्युनिस्ट पक्षाच्या राष्ट्रीय समितीनें १२ एप्रिलला एक पत्रक काढलें. त्याची एक प्रत मी पाहिली आहे. त्यांत कॅस्त्रोच्या २६ जुलै चळवळीचें नेतृत्व करणाऱ्या श्री. फॉस्टिनो पेरेझ यांच्यावर संपाची 'एकतर्फी हांक' देऊन संप अपेशी केला याचा ठपका ठेवण्यांत आला आहे. ( Declaraciones del P. S. P. 12 de abril 1958)

या सुमारास डोंगराळ मुलखांत कॅस्त्रोच्या अनुयायांची संख्या फक्त तीनशेच्या आसपास होती, असें मिल्सना सांगितलें गेलें. नंतर चार महिन्यांनी, ऑगस्ट महिन्यांत ग्वव्हॅरा व कॅमिलो सिएनफ्युएगॉस या दोन मेजरांच्या कडे क्यूबा बेटाचे दोन भाग करण्याची —सबंध क्रांतींतील सर्वांत मोठी-कामगिरी सोंपवण्यांत आली; त्यावेळीं, त्यांच्या हाताखालीं असलेल्या दोन तुकड्यांत मिळून २२० माणसें होतीं, असें ग्वव्हॅरा यांनींच सांगितलें आहे. ( Verde Olivo, ३ ऑक्टोबर १९६० ) सुरवातीपासून शेवटपर्यंत सबंध क्यूबांत असलेल्या barbudos चा एकूण आंकडा फक्त ३००० होता, असें सार्त्रला सांगितलें गेलें आहे. थेट शेवटपर्यंत कॅस्त्रोचें सैन्यबळ इतकें क्षुल्लक होतें, कीं त्याला साधें सैन्यहि म्हणतां येणार नाहीं, मग 'शेतकऱ्यांचें सैन्य' तर दूरच राहो; आणि शेवटच्या चार-पांच महिन्यांत सतत भरती होत असूनहि त्याला प्रचंड असें स्वरूप कधींच आलें नाहीं. परंतु तरी सैन्याचें स्वरूप त्याच्या अधिकाऱ्यांवरून ठरत असतें—आणि येथें सततच नेतृत्व निव्वळ मध्यमवर्गाच्या हातीं राहिलें,—तें सैन्यांतल्या साध्या शिपायांवरून ठरत नाहीं—नाहींतर जगांतील कोणतेंहि सैन्य हें शेतकऱ्यांचें व जनतेचें सैन्य झालें असतें.

मग ह्या छोट्याशा टोळीला बॅटिस्टांच्या ४०००० पेक्षां जास्ती असलेल्या सैन्याचा 'पराभव' कसा करतां आला ?

याचें उत्तर असें आहे, कीं ह्या छोट्याशा टोळीनें बॅटिस्टांच्या सैन्याचा पराभव लष्करी अर्थानें मुळीं केलाच नाहीं. बॅटिस्टांनींच स्वतःचा विनाश ओढवून घेतला; त्यांना असें करायला लावण्यांत त्या टोळीला यश आलें. १९५८ च्या वसंत ऋतूपर्यंत क्यूबांत जवळ जवळ सर्वत्रच जीवनक्रम सुरळीत चालला होता. परंतु एप्रिल-संपाच्या अपयशानें कॅस्त्रोला आपल्या योजना व उपाय बदलणें भाग पाडलें. जनतेच्या उठावाबाबत निराशा पदरीं पडल्यावर, त्यानें सरळसरळ गनिमी युद्ध पुकारलें—बॉंबफेंक, आगी लावणें, मोडतोड करणें, हल्ला करून पळून जाणें, असले प्रकार सुरू झाले. या दहशतीला बॅटिस्टांनीं उत्तर दिलें तें प्रतिदहशतीनेंच. सैन्यानें व गुप्त पोलिसांनीं आंधळेपणानें, दयामाया न दाखवतां बेधडक प्रत्याघात केला. उपद्व्यापाचा मुख्य ठपका विद्यार्थ्यांवर ठेवण्यांत येऊन तेच प्रामुख्यानें बळी पडले. शहरांतील रस्त्यावरून चालण्यापेक्षां डोंगराचा आश्रय घेणें तरुणांना अधिक सुरक्षिततेचें झालें. खून-छळणूक-पाशवी आचरण यांमुळें सबंध क्यूबन जनतेंत व विशेषतः मध्यमवर्गीय विद्यार्थ्यांच्या मध्यमवर्गीय आईबापांना भयंकर जरब बसली.

यामुळें येणारा सार्वत्रिक उबगहि बॅटिस्टांच्या राजवटीच्या शेवटच्या सहा महिन्यांत त्यांच्यांच सैन्यांतहि पसरला; आणि त्यामुळें कॅस्त्रोचीं लपण्याचीं ठिकाणें धुंडाळण्याची मे महिन्यांत सुरू केलेली मोहीम सैन्य पार पाडूं शकलें नाहीं. मिल्सच्या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें, बॅटिस्टांचें सैन्य 'वाफ होऊन हवेंत विरून गेलें.' दोन्ही पक्षांत आलेले संघर्ष इतके थोडे व अनिर्णायक होते, कीं बॅटिस्टांच्या पदत्यागानें कॅस्त्रोहि चकित झाला. ह्या लढ्यांतील विजेतेपद कॅस्त्रोच्या 'शेतकऱ्यांच्या सैन्या'कडे जात नाहीं, तें क्यूबाच्या आम जनतेकडे जातें. सर्वांत अधिक झीज मध्यमवर्गीय नागरी प्रतिकार चळवळीनें सोसली; ह्या चळवळीनें जें राजकीय व वैचारिक वातावरण निर्माण केलें, त्याचमुळें बॅटिस्टांचें सैन्य असें बॅटिस्टांवरच उलटलें. डोंगरांत झालेल्या शेवटच्या चकमकींत बॅटिस्टांच्या सैन्यानें व पोलिसदलानें १००० barbudos मारले व शहरांतील प्रतिकार चळवळींत त्यांच्याच हातीं १९००० माणसें कामास आलीं, अशी माहिती सार्त्रला सांगण्यांत आली आहे.

ह्याचा अर्थ असा, कीं कॅस्त्रोचे गनिमी कावे शत्रूचा 'पराभव' करण्याकरितां अवलंबिलेले नसून, त्याचा तोल सुटावा, दहशतीला त्यानें प्रतिदहशतीनें अतिशय मोठ्या प्रमाणावर तोंड द्यावें, आणि सामान्य नागरिकाला जिणें असह्य करून सोडावें, याकरितांच



अनुक्रमणिका






त्यांची योजना करण्यांत आली होती. असले डाव कांहीं थोडक्या बंडखोरांनिशी सुद्धां खेळतां येतात, आणि हेच डाव आतां व्हेनिझ्युएलांतील रोम्युलो बेटॅनकोर्ट यांच्या लोकशाही सरकारविरुद्ध खेळले जात आहेत. कॅस्त्रोनें बॅटिस्टांविरुद्ध वापरलेली दहशतच आतां कॅस्त्रोविरुद्ध वापरली जात आहे. आणि कॅस्त्रोनें बॅटिस्टांप्रमाणेंच प्रतिदहशतीनें उत्तर दिलें आहे.

## दुधा-मधाची भूमि

क्यूबन क्रांतीचा 'विश्वासघात' केला गेला काय ? – या प्रश्नाचें उत्तर देण्यांतहि सत्तेकरतां चाललेला झगडा ही गोष्ट आपल्याला मदत करते. अर्थात् कोणती क्रांति आपल्याला अभिप्रेत आहे, त्यावरच ह्या प्रश्नाचें उत्तर अवलंबून आहे,– सत्तेवर येण्यापूर्वी कॅस्त्रोनें वचन दिलेली क्रांति, कीं सत्ता हातीं घेतल्यावर त्यानें घडवून आणलेली क्रांति ?

'फिडेलनें शब्द दिला होता आणि तो अक्षरन् अक्षर पाळण्याचा त्याचा निर्धार होता.' – असें हबरमन व स्वीझी यांनीं लिहिलें आहे. पण ते, किंवा मिल्स, किंवा सार्त्रे, कोणींच कधीं हीं वचनें काय होतीं, याबद्दल कांहीं सांगत नाहींत. अशाप्रकारें कानाडोळा करणें, हाहि एक भाकडकथेचा आवश्यक भागच आहे.

१९५८ अखेरपर्यंत कॅस्त्रोनें दिलेल्या आर्थिक व राजकीय वचनांची एक यादीच मीं त्याच्या १९५३च्या खटल्याच्या वेळच्या भाषणावरून काढलेली आहे. हीं वचनें एवढ्यांतच इतकीं गोंधळांत टाकणारीं बनलीं आहेत, कीं कॅस्त्रोचे कांहीं साहित्यिक समर्थक त्यांचा उल्लेखदेखील वगळून नव्यानें (दोन वर्षें उलटायच्या आंतच) इतिहास लिहायला बसले आहेत.[४]

**राजकीय :**

* १९४० ची घटना पुनः प्रस्थापित करणें व सार्वत्रिक निवडणुकांनीं सरकार बनवणें, हा पहिला क्रांतिकारक कायदा असेल, असें कॅस्त्रो आपल्या १९५३ सालच्या भाषणांत म्हणाला होता.

* जुलै १९५७ कॅस्त्रोचा जाहिरनामा ही सिएरा मैस्त्रोहून त्यानें केलेली पहिली राजकीय घोषणा. त्यांत एक वर्षानंतर सार्वत्रिक निवडणुका घेण्याचें व १९४० च्या घटनेनें दिलेल्या वृत्तपत्रांचें स्वातंत्र्य, वैयक्तिक व राजकीय हक्क यांची 'निर्विवाद हमी' घेत असल्याचें एक 'औपचारिक वचन' त्यानें दिलें होतें.

४. कॅस्त्रोचीं १९५९ सालाच्या आधींचीं वचनें हबरमन आणि स्वीझी यांनीं एका विशिष्ट तऱ्हेनें हाताळलीं आहेत. १९५३ सालच्या भाषणाकरतां १२॥ पानें खर्ची घालण्यांत आलीं आहेत, परंतु क्रांतीचा पाया म्हणून त्यानें पांच कलमी कार्यक्रम मात्र वगळण्यांत आला आहे. ह्या कार्यक्रमाचा आरंभींचा भाग असा आहे : 'The first revolutionary law would have restored sovereignty to the people and proclaimed the constitution of 1940 as the true supreme law of the state, until such time as the people should decide to modify it or to change it.' इतर कलमांत छोट्या शेतकऱ्यांना जमिनी देण्याची व जुन्या मालकांना योग्य ती भरपाई देण्याची तरतूद होती; नफ्यांत वांटा असण्याचा कामगारांचा हक्क मान्य करण्यांत आला होता; सर्व बागायतदारांना ऊंसाच्या पिकाचा अधिक वांटा मिळण्याची व बेकायदेशीर मार्गानें मिळवलेली सर्व मिळकत सरकारजमा करण्याची हमी होती.

ह्या भाषणांत आणखीहि कांहीं मुद्दे आहेत, परंतु कार्यक्रम म्हणून एवढी एकच बाब विशेष करून सांगितली आहे,—असें असतांना ती गाळतां कशी येईल ? ती गाळली जावी याचें नवल वाटतें. जुलै १९५८ च्या एकता कराराचीहि हीच गत करण्यांत आली आहे. त्यांत तीन मुद्दे आहेत: एक समान strategy, युद्धोत्तर 'normality' आणि 'किमान सरकारी कार्यक्रम'. दुसरा मुद्दा मीं वर जसाच्या तसा उद्धृत केला आहेच. हबरमन व स्वीझी यांनीं ह्या एकता करारांतील एक परिच्छेद उद्धृत केला आहे; त्यांत अमेरिकेनें बॅटिस्टांना कांहींहि लष्करी वा अन्य मदत देऊं नये, अशी अमेरिकेला विनंती करण्यांत आली आहे. परंतु हा तीन कलमी कार्यक्रम मात्र हबरमन व स्वीझी विसरून गेले आहेत. त्याचा उल्लेख झाला असता, तर कॅस्त्रोचीं वचनें वेगळ्या दृष्टिकोनांतून दिसलीं असतीं.

मिल्सनीं तर कॅस्त्रोच्या अधिकारग्रहणापूर्वीच्या सर्व शपथा सरळपणें दुर्लक्षिल्या आहेत.

* क्यूबांतून निर्वासित झालेल्या नागरिकांना लिहिलेल्या १४ डिसेंबर १९५७ च्या पत्रांत कॅस्त्रोनें, सार्वत्रिक निवडणुका घेणें हें बॅटिस्टांनंतर आलेल्या सरकारचें 'पहिलें कर्तव्य' असल्याचें व हंगामी सरकारच्या कारकिर्दीत राजकीय पक्षांचे प्रचार-स्वातंत्र्याचे अधिकार मान्य केले होते.

'खरें खुरें प्रातिनिधिक सरकार' असावें, बारा महिन्यांत 'प्रामाणिक' निवडणुका घेतल्या जाव्यात, वृत्तपत्रें, प्रचार-साधनें आणि १९४० च्या घटनेंत उल्लेखिलेले व्यक्तिगत व राजकीय हक्क पुन्हां प्रस्थापित करणें —याकरितां आपण झगडत आहोंत, असें त्यानें Coronet मासिकाच्या फेब्रुवारी १९५८ च्या अंकांत लिहिलेल्या लेखांत म्हटलें होतें. आणि सर्वांत मोठा विनोद म्हणजे 'लष्करी हुकुमशाहीच्या जागीं क्रांतिकारक हुकुमशाही' प्रस्थापित करण्याच्या आरोपाचा त्यानें इन्कार केला होता.

* Jules Debois यांना मे १९५८ मध्यें दिलेल्या उत्तरांत १९४० ची घटना 'संपूर्णपणें अंमलांत' आणण्याची व 'एक वर्षाच्या आंत सार्वत्रिक निवडणुका घेऊन, संपूर्णपणें नागरी हंगामी सरकार स्थापन करून देशांत परत व्यवस्था आणण्याची' शपथ कॅस्त्रोनें घेतली होती.

* जुलै १९५८ च्या एकता जाहिरनाम्यांत "हुकुमशाहीच्या पाडावानंतर थोडक्या काळपर्यंत एक हंगामी सरकार स्थापन करून देशांत सुव्यवस्था व संपूर्णपणें घटनात्मक व लोकशाहीवादी कारभार" आणण्याचें कॅस्त्रोनें कबूल केलें होतें.

## आर्थिक—

* १९५३ सालीं केलेल्या भाषणांत, लहान बागायतदारांना व शेतकऱ्यांना जमिनी देण्यास व जमिनींच्या पूर्वीच्या मालकांना भरपाई देण्यास कॅस्त्रोनें पाठिंबा दिला होता. नफ्यांत वांटा असण्याचा कामगारांचा हक्क, बागायतदारांना ऊंसाच्या पिकांत जास्ती भागी देण्याचें, आणि बेकायदेशीरपणें बळकावलेल्या मिळकती सरकारजमा करण्याचें त्यानें मान्य केलें होतें. शेतकी धंद्यांना कमाल जमीनधारणा आणि उरलेल्या जमिनींचें शेतकऱ्यांना वांटप —– ह्या गोष्टींचा त्याच्या शेती-सुधारणेंत अंतर्भाव होता; 'महाग अवजारें, थंड गुदामें आणि लागवडींत व पशुसंवर्धनांत एकच तांत्रिक दिग्दर्शन' यांचाहि अंतर्भाव ह्या सुधारणांत होता. याखेरीज वीज व टेलिफोन कंपन्यांचें राष्ट्रीयीकरण करण्याचा विचारहि त्यानें ह्या भाषणांत व्यक्त केला होता.

* आधीं भरपाई देऊन ओसाड जमिनींचें वांटप आणि कुळांना कसलेल्या जमिनींची मालकी देणें — अशा शब्दांत शेतकी-सुधारणेची व्याख्या जुलै १९५७ च्या जाहिरनाम्यांत केली होती.

* 'पूर्वीच्या मालकांना योग्य ती भरपाई' देऊन शेतकऱ्यांना जमिनींचे मालकी हक्क देण्याचा कल coronet मधील लेखांत होता. परकीय धंद्यांचें राष्ट्रीयीकरण वा स्वदेशीकरण करण्याच्या कांहीच योजना आपल्यापाशीं नाहींत व जनतोपयोगी धंदे सरकारच्या मालकीचे करण्याचा आपला पूर्वीचा कार्यक्रम आपण स्थगित केला आहे, असेंहि ह्या लेखांत सांगितलें होतें. राष्ट्रीयीकरणाबाबत त्यानें लिहिलें होतें :

"व्यक्तिशः मला आतां असें वाटूं लागलें आहे, कीं राष्ट्रीयीकरणाचा उपाय हा अतिशय अडचणीचा उपाय आहे. त्यामुळें राष्ट्र मुळींच अधिक बळकट होत नाहीं, उलट खाजगी उद्योगधंदे त्यामुळें दुबळे बनतात. शक्य तितक्या जलदीनें औद्योगीकरण करण्याच्या आपल्या आर्थिक कार्यक्रमांतील मुख्य मुद्याचीहि सार्वत्रिक राष्ट्रीयीकरणानें उघडउघड पीछेहाट होते. या कारणाकरितां परकीय भांडवलाचें येथें नेहमींच स्वागत केलें जाईल व तें सुरक्षित ठेवण्याची हमी घेतली जाईल."

*१९५८ च्या मे महिन्यांत Jules Dubois यांना त्यानें खालील गोष्टी ठामपणें सांगितल्या होत्या :

"उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण वा सामाजीकरण करण्याच्या गोष्टी २६ जुलै चळवळीनें कधींच काढलेल्या नाहींत. आमच्या क्रांतीसंबंधीं बाळगली जाणारी ही भीति निव्वळ निर्बुद्धतेंतून उद्भवलेली आहे. क्रांतीच्या पहिल्याच दिवसापासून, आम्ही १९४० ची घटना पुन्हां प्रस्थापित करण्याकरितां झुंजत आहोंत, असें आम्हीं सांगितलें आहे; आणि १९४० च्या घटनेनें उत्पादनांत सहभागी होणाऱ्या सर्वांचीं कर्तव्यें, हक्क व








त्यांची हमी यांची नोंद केली आहे. स्वतंत्र उद्योगधंदे उभारणें, भांडवल गुंतवणें याच बरोबर इतरहि आर्थिक, राजकीय व नागरी हक्क घटनेनें नोंदवले आहेत. ''

* जुलै १९५८ चा जाहिरनामा स्वतः कॅस्त्रोनेंच लिहिला होता. अपराध्यांना शासन केलें जाईल अशी हमी देणारा किमान सरकारी कार्यक्रम, कामगारांचे हक्क, आंतरराष्ट्रीय करारनाम्यांची परिपूर्ति, नागरी जीवनांत सुव्यवस्था, शांतता, स्वातंत्र्य आणि क्यूबन जनतेची आर्थिक, सामाजिक व राजकीय प्रगति –एवढयाच गोष्टी ह्या जाहिरनाम्यांत होत्या.

फिडेलनें दिलेलीं वचनें हीं अशीं होतीं. जानेवारी १९५९ मध्यें जनता कॅस्त्रोचा विजय मानून चालली, तें कांहीं त्याच्या शूर लढयाला व मोहक दाढीला भाळून नव्हे, तर कॅस्त्रोंत त्यांच्या राजकीय आकांक्षा मूर्त झाल्या आहेत, असें त्यांना वाटलें म्हणून. १९४४ ते १९५२ या कालखंडांत लोकशाहीनें लोकांची निराशा केली होती, बॅटिस्टांच्या १९५२ ते ५८ च्या सहा वर्षांच्या कारकिर्दीनेंहि अशीच निराशा केली होती. परत त्याच विकृत लोकशाहीकडे क्यूबानें वळूं नये, याबद्दल सर्वसामान्यतः जनतेंत एकमत होतें; क्यूबांत परत एकदां प्रियो सोकारास आणि बॅटिस्टा निर्माण होऊं नयेत, म्हणून आमूलाग्र सामाजिक व आर्थिक सुधारणा घडवून आणण्यास मध्यमवर्ग राजी होता. क्यूबन लोकशाहीची परत प्रतिष्ठापना करण्याचें वचन कॅस्त्रोनें दिलें होतें,– direct किंवा 'लोकांची' लोकशाही नव्हे, तर १९४० च्या घटनेशीं संलग्न झालेली लोकशाही,– कारण १९४० ची घटना इतकी परिपूर्ण होती, कीं त्यांतील शेतकी-सुधारणेचीं कलमेंसुद्धां कधींच अंमलबजावणींत आलीं नाहींत.

कॅस्त्रोनें क्यूबन जनतेला आज जें दिलें आहे, त्याची पुसटशी जरी कल्पना त्यानें जनतेला आधीं दिली असती, तर त्याला सत्ता जिंकतां येणें निव्वळ अशक्य होतें. कारण आज वृत्तपत्रें व प्रचाराचीं इतर सर्व साधनें संपूर्णपणें सरकारच्या हातीं आहेत, निवडणुकांची टिंगल करण्यांत आली आहे, धनिकांची मालमत्ता लुबाडून तिचें सामाजीकरण करण्यांत आलें आहे, 'सहकारी शेतें' हीं निव्वळ 'सरकारी शेतें' आहेत ही गोष्ट तर हबरमन व स्वीझीहि कबूल करतात. आज क्यूबांत एक हुकूमशाही आहे. कसल्याहि प्रकारची हुकूमशाहीच –मग ती जनतेची का असेना– क्यूबांत येणार, अशी कल्पना जेर जनतेला असती, तर इतिहास वेगळा घडला असता. कॅस्त्रोनें ज्या स्वरूपाचीं वचनें जनतेला दिलीं, त्यामुळेंच त्याला मध्यम व इतर वर्गांचा अंतःकरणपूर्वक पाठिंबा मिळूं शकला; कॅस्त्रोला जर 'शेतकऱ्यांची क्रांति' अभिप्रेत असती, तर ह्या वचनांचें स्वरूप हेंच राहणें अशक्य होतें.

म्हणून आपण किमान एवढें तरी नक्की म्हणूं शकतों कीं, कॅस्त्रोनें वचन दिलें एका प्रकारच्या क्रांतीचें, आणि प्रत्यक्षांत घडवून आणली वेगळीच क्रांति. वचन दिलेल्या क्रांतीचा कॅस्त्रोने विश्वासघात केला, हें निर्विवाद सत्य आहे.

( अपूर्ण )

---










डॉ. वसंत देशपांडे

# पुरुषसूक्ताचा कवि नारायण नसेल कां ?

१. श्री. ना. गो. चापेकरांचा 'पुरुषसूक्ताची मीमांसा' हा विचारप्रवर्तक लेख नवभारत ( नोव्हेंबर १९६० ) च्या अंकांत आला आहे. पुरुषसूक्ताचा कवि नारायण असल्याचें त्यांना मान्य दिसत नाहीं. हें सूक्त ऋषिहीन आहे असें धरून चालल्यास हरकत नाहीं, असें श्री. चापेकर म्हणतात.

नारायण कां नसावा, ह्याबद्दलची त्यांची भूमिका अशी दिसते. पूर्वीच्या एका लेखांत ते म्हणतात : 'कित्येक सूक्तें अशीं आहेत कीं, त्यांचा जो ग्रंथोक्त ऋषि म्हणजे मंत्रद्रष्टा अथवा मंत्रकर्ता हें खात्रीने सांगणें अशक्य आहे. ( पान २ नवभारत, एप्रिल १९५८ ). त्यांच्यातर्फे असेंहि म्हणतां येईल कीं ऋग्वेदांत 'नारायण' एकदांच येतो, तोहि व्यक्तिवाचक स्वरुपांत, देवतावाचक नारायण कोठेहि आढळत नाहीं. नारायण संप्रदायाचा प्रत्यक्ष उल्लेखहि कोठें दिसत नाही. ह्या सर्व कारणांवरून पुरुषसूक्ताचा कवि नारायण नसावा असें, श्री. चापेकर यांना वाटणें साहजिकच आहे.

२. पुरुषसूक्ताचा कवि नारायण आहे किंवा नाहीं, हा एका अर्थानें फार महत्वाचा मुद्दा वरवर पाहतां दिसत नाहीं. पण ह्या विचारांत ऋग्वेद कालसंबंधित असे इतर कांहीं धार्मिक व सांस्कृतिक प्रश्न थोड्याफार प्रमाणांत उद्भवत असल्यामुळें, याबाबतींत जास्त चर्चा होणे जरूर आहे, असें वाटून कांहीं विचार सुज्ञांपुढे मांडित आहे.

३. पहिल्याप्रथमच हें सांगावेंसें वाटतें कीं आपल्या संस्कृतीचें वैशिष्ट्य हें कीं, आपले पूर्वज परंपरा टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असत. ऋग्वेदांत व अथर्ववेदांत ( काण्ड १९ सूक्त ६ ) पुरुषसूक्त कवि नारायण आहे असें परंपरा सांगते. नारायण नाहीं म्हणण्यानें या सूक्ताचा विशेष अर्थ लागत असला तर नाहीं म्हणावयास हरकत नाहीं. तसें कांहीं श्री. चापेकर दाखवित नाहींत. पण नारायण कवि म्हणून जी परंपरा आहे असें धरून चालण्याने मात्र कांहीं विचारांचा उलगडा होण्यांस मदत होईल, हें ह्या लेखांतून दाखवावें म्हणतो.

### ४. वरुण व नारायण पंथ

( अ ) वसिष्ठ हा वरुणाचा मुलगा आहे, असें खुद्द ऋग्वेदांतच येतें. आणि त्याची आई उर्वशी ही गोष्ट त्याच सूक्तांत येते. पण पुढे पुराणकथेवरून ही उर्वशी नारायण कन्या होय असें कळतें. शिवाय उर्वशी 'अप्'सरा आहे व ती नारायण ( आपो : नारः ) कन्या आहे, ह्या सांकेतिक भाषेंत वसिष्ठ-उर्वशी विचाराचा जलसंप्रदायाशीं ( नारायण पंथाशी ) संबंध आहे असें म्हणावें लागतें.

( आ ) वरुणाची बरीचशी स्तुति वसिष्ठऋषिनींच गायिली आहे, आणि हें योग्यच आहे. वसिष्ठ स्वतःला वरुणपुत्र समजतात. आणि वसिष्ठवंशीय व्यास तर पुढें महाभारतांत नारायणीय धर्मच सांगतात.

( इ ) अनेक विद्वानांना ऋग्वेदांतील वरुणभक्तीचा प्रकार इंद्रभक्तीपेक्षां अगदीच आगळा वाटतो. वरुणभक्तीची तऱ्हा, ऋग्वेदांत फारच थोड्या प्रमाणांत सांपडते. याउलट वरुणभक्तीपेक्षां निराळी भक्ति अनेक इंद्रसंबंधित सूक्तांतून सर्वत्र दृष्टीस पडते. यावरून वरुणभक्ति त्याकाळीं ऋषींना विशेष आवडीची नसावी, हें स्पष्ट आहे. वरुणभक्तीचा प्रकार आर्यांचा नव्हे असें प्रा. ह. दा. वेलणकरांना वाटतें. ( ऋग्वेदांतील भक्तिमार्ग ). हेंहि स्पष्ट दिसतें कीं, ऋग्वेदांतील वरुणभक्तीमध्यें नारायण संप्रदायी 'दास्यभक्ति' आहे ( दासो न अर्थः ७-८६ ). गीतेच्या सुमारांस वरुण संपूर्ण नारायणरूपी झालेला दिसतो ( वरुणो यादसामहम् : अध्याय १०-२९ ). एवढेंच नव्हे तर ऋग्वेदांतच द्यौ लोकांतील वरुण आपस्वरूपी ( नारस्वरूपी ) होऊं लागतो. व अथर्ववेदांत पाणी हें त्याचें घर होतें ( अप्सु ते राजन् वरुणगृहः ७-८३ ) द्यौ लोकाचा वरुण जलस्वरूपी कसा झाला याचें कारण अजूनपर्यंत कुणी सांगितलें आहे, असें दिसत नाहीं. पण ऋग्वेदकालींच नारायण



अनुक्रमणिका







संप्रदायाचा वरुणाशीं संबंध आलेला होता, पण तो स्पष्टपणें व्यक्त झालेला नाहीं असें गृहीत धरल्यास ह्याचा उलगडा होणार आहे; आणि नारायणसंप्रदायाचा स्पष्टपणें कां उल्लेख आला नसावा याचें कारण म्हणजे अनेक संशोधकांच्या मतें तो अवैदिक आहे.

## पुरुषसूक्त व नारायणीय गीता

गीतेंतील कांहीं समान विचार व समान संकेत पुरुषसूक्तांत आहेत, असें स्पष्टपणें दिसतें.

( अ ) चातुर्वर्ण्याचा निर्देश ऋग्वेदांतील पुरुषसूक्ताच्या १२ व्या ऋचेंत आढळतो. तर गीतेंत ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ( अध्याय ४-१३ ) हा श्लोक आढळतो. आणि ह्या दोन्हीं विचारांत चातुर्वर्ण्य गुणकर्मावरच आधारलेलें आहे.

( आ ) पुरुषसूक्तांत ' यज्ञाचा ' नेहमीचा वैदिक अर्थच बदलला गेला आहे. यज्ञ येथें ' सांकेतिक ' अर्थांतच वापरला गेल्याचें दिसतें. गीतेमध्यें तर ह्या ' सांकेतिक ' अर्थांतच वापरला गेल्याचें दिसतें. गीतेमध्यें तर ह्या ' सांकेतिक ' यज्ञाचा भरपूर पुरावा दिसतो : द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, ज्ञानयज्ञ असे विविध यज्ञ ' गीताकार ' सांगतात ( अध्याय ४-२८ ). ' यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ' ( अध्याय ३-९ ) ह्या श्लोकांत यज्ञाकरितां म्हणजे पुरुषाकरितां.

' यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ' ह्या पुरुषसूक्तातील विचाराचें स्पष्ट पडसाद गीतेंतील ' सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा ' ( अध्याय ३-१० ) ह्या विचारांत दिसतात.

( इ ) पुरुषसूक्तांत तीन पुरुष वर्णिले आहेत, असें श्री. चापेकर सांगतात. हे तीन पुरुष म्हणजे : पुरुष, विराटपुरुष व अधिपुरुष, ह्या तीन पुरुषांचें वर्णन पहिल्या ५ मंत्रांत आलें आहे. गीतेंतहि तीन पुरुष सांगितले आहेत : क्षरपुरुष, अक्षरपुरुष व पुरुषोत्तम.

वरील सर्व विचारांवरून गीतेंतील नारायणीय पंथाचा संबंध पुरुषसूक्तांपर्यंत जाऊन भिडतो हें उघड आहे.

( ५ ) वरुण विचार व गीतेंतील नारायणीय विचारांत पुरुषसूक्तांतील कांहीं विचारांचे पडसाद, ह्यावरून नारायण संप्रदायाचें अस्तित्व ऋग्वेद कालांत असलें पाहिजे असें म्हणावें लागतें; आणि हें मान्य केल्यास ' नारायण ' व्यक्तिवाचक नांव त्यावेळीं असावें असें म्हणण्यांत कांहीं चूक आहे असें वाटत नाहीं.

शतपथ ब्राह्मण कालांत तर नारायण व्यक्तिवाचक नांव असल्याचा स्पष्ट पुरावा मिळतो. त्या ग्रंथांत असा उल्लेख आहे, कीं नारायण ऋषि विराट् होण्यासाठीं पंचरात्र पुरुषमेध यज्ञ करून आपलें उद्दिष्ट साध्य करतो. प्रा. सुरेंद्रनाथ दासगुप्ता असें म्हणतात : ' The Pāncharātra doctrines are indeed very old and are associated with the Purusa-sūkta of Ṛg-Veda, which is, as it were, the foundation stone of all future Vaiṣṇava philosophy. It is said in Śat-patha Brāhmana that Nārāyana, the great being wishing to transcend all other beings and becoming one with them all, saw the form of sacrifice, known as Pancharātra, and by performing that sacrifice attained his purpose ( Śat-patha Brāhmana XIII. 6. 1 ). The passage also implies that Nārāyana was probably a human being who became a transcending divinity, by performing the Pancharātra sacrifice. ( History of Indian Philosophy vol. III p. 12 ).

जर शतपथ-ब्राह्मणांत हें नांव खास प्रचलित होतें तर ह्या नांवाची परंपरा ऋग्वेदकालांत असण्याची शक्यता बरीच उद्भवते. दुसऱ्या तऱ्हेने असेंहि म्हणतां येईल : ऋग्वेदांतच ' पूर्वेभिः ऋषिभिः इड्यो नूतनै ऋत ( मंडळ १-१-२ ) असें म्हटलें आहे. हा पुरुष सूक्तकार नारायण ऋषि ' नवा ' आहे. व त्याचे विचारहि यज्ञांवरचे क्रांतिकारी व नवे आहेत.

म्हणून, पुरुषसूक्ताचा कवि नारायण आहे, असें जी परंपरा सांगते त्यांत तथ्य आहे असें वाटतें.

---

श्री. श्री. रा. टिकेकर

# पानिपत

कौरव पांडव संगर तांडव द्वापर कालीं होय अती ।
तसे मराठे गिलचे साचे कलींत लढले पानपतीं ॥

— गोविंदाग्रज

पानिपत युद्धास या वर्षाच्या प्रारंभीं दोनशें वर्षें पुरीं झालीं. ह्या निमित्तानें बरेंच ऐतिहासिक साहित्य प्रकाशित झालें. तें सर्वच ह्या परामर्शासाठीं हातीं आलें नाहीं. सांगलीकरांच्या दप्तरांत सांपडलेलीं पत्रें श्री. शंकरराव जोशी संपादित आहेत. पंजाब युनिव्हर्सिटीनें कांहीं साहित्य प्रसिद्ध करण्याचें योजलें होतें-तेंहि मिळालें नाहीं. प्रा. शेजवलकरांचा विवेचनात्मक ग्रंथ हा विशेष महत्त्वाचा. बाकीचीं पुस्तकें साधनांचीं आहेत. काशिराजाची मूळ फार्सी 'बखर' तिचा इंग्रजी अनुवाद ह्या दोन्हीचें एक पुस्तक म्हणजे जोगेश्वरीच्या इस्माइल युसुफ कॉलेजची 'भेट' समजावी. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें-श्री. फाटक-श्री. सेतुमाधवराव पगडी-या संपादकद्वयांकडून बरेचसें साधन-साहित्य उपलब्ध करून दिलें-त्यांत काशिराजाच्या बखरीचा मूळ फार्सीवरून केलेला अनुवाद आहे. श्री. कुंटे एकाकी पडले. त्यांनीं ब्राऊनच्या इंग्रजी सारांशरूपी अनुवादाचा मराठी तर्जुमा ( काशिराजाच्या बखरीचा ) आघाडी मारण्यासाठीं (!) झटपट उरकला. अशा सर्व साहित्याचा परामर्श घ्यावयाचा आहे. साधन ग्रंथांत काशिराजाचे 'अवतार' प्रथम येतात. मूळ फार्सीबद्दल अनभिज्ञानें काय लिहावें ? अस्सल साधन उपलब्ध करून दिलें याबद्दल मनःपूर्वक आभार; पोटभर शाबासकी- आणि कृतज्ञता. इंग्रजी अनुवाद प्रो. गै यांचा. सेतुमाधवराव व कुंटे या दोघांचे मराठी अनुवाद. पैकीं कुंटे यांचा

## प्रकाशनें

**१. पानिपत १७६१**
लें० प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर
जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणें २.
पृ. २६८; किं १० रु.

**२. पानि (नी) पतचा संग्राम**
सं. श्री. न. र. फाटक;
श्री. सेतुमाधवराव पगडी
मराठी ग्रंथसंग्रहालय प्रकाशन, मुंबई २.
पृ. १८८ किं. ५ रु.

**३. पानिपतची मोहीम** ( काशिराजाचा वृत्तांत )
अनु. श्री. भगवान ग. कुंटे.
मुरली प्रकाशन, मुंबई २८.
पृ. ५२. किं. १-५० रु.

**४. पानिपत वृत्तांत**-काशीराजलिखित. ( फार्सी )
सं. आणि इं. अनु. प्रो. बी. एम्. गै,
प्र. इस्माइल युसुफ कॉ. मुंबई ६०.
पृ. ४२ फार्सी; ३९ इं. किं. २-५० रु.

'ब्राऊन'च्या इंग्रजीचा कसा तरी, घाईनें उरकलेला, धांदलींत कसा तरी छापलेला, अनुवाद पाहून बिचारा काशिराजहि रडला असता ! कारण कुंटे यांनीं तो अनुवाद बोध होण्यासाठीं केला असें वाटत नाहीं. रॉलिन्सनची ब्राऊनच्या अनुवादाची प्रत

त्यांनीं पुढें ठेवली असली तरी त्या विद्वानाची टिपणी त्यांनीं पाहिलेली दिसत नाहीं. एरवीं –

अनूपेश्वर ( = अनूपशहर पृ. ८ )
भागपूत ( = बागपत पृ. २२ )
सुत्रोलख सराय ( = सामलखा सराय पृ. २२ )
मिरहट ( = मीरत, मेरठ पृ. २३ )
सिंधवी ( = शेणवी पृ. ६ )
वेदीबहाद्दर ( = वेणीबहाद्दर पृ. १५ )
देवी दूत ( = देवीदत्त पृ. १७ )
कच्छी ( = कच्छवाहा पृ. २२ )

–असे हास्यास्पद प्रकार कसे संभवतील ? ब्राऊननें चूक केली ( किंवा त्याची चूक झाली ) आणि मूळ संग्रामाची ता. ७ जाने. अशी त्यानें लिहिली. ती चूक असून खरी ता. १४ जाने. असें रॉलिन्सननें स्पष्ट टीपेंत म्हटलें असतां कुंटे यांनीं आपल्या अनुवादांत " सात जानेवारी " अशीच चुकीची तारीख छापावी याचें आश्चर्य वाटतें. केशरी ठसा ( हाताचा ) उठवून पाठविण्याची रीत ठाऊक नसल्यानें " मूठभर केशर " पाठविलें असा निर्बोध अनुवाद ( पृ. २८ ) आमच्या पदरीं पडला !

कुंटे यांच्या अनुवादाला प्रा. आगासकर यांची आशीर्वादपर प्रस्तावना आहे; अनुवादकाचें ( लेखकाचे म्हटलेलें ) निवेदन आहे; अनुवादकाची ( लेखकाची म्हटलेली ) वेगळी प्रस्तावना पण आहे. तरी शिताफी अशी कीं हा अनुवाद कोणत्या प्रतीचा आहे, मूळफार्सीवरून केला आहे कीं ब्राऊन, जदुनाथ, यांच्या इंग्रजीवरून केला. अथवा लोकहितवादींचाच मराठी अनुवाद ( ब्राऊनच्या इंग्रजीचा ) सुधारून घेतला, हें सांगण्याचें अजीबाद टाळलें आहे. अशा लिखाणांत–अनुवादांत–याबाबतचें मौन लबाडीच्या सदरांत जातें आणि असा आरोप नवोदित, होतकरूंनीं तरी आपणांवर ओढवून घेऊं नये. कुंटे यांनीं "बारा प्रश्न" उपस्थित केले आहेत, त्यांवरून त्यांचें इतिहासाचें अध्ययन कळतें–सूक्ष्म चिकित्सक दृष्टीचेंहि ओझरतें दर्शन होतें. पण त्या द्वादश प्रश्नावलीस पुस्ती जोडण्याचा मोह आवरत नाहीं. ब्राऊनचें नांव घेण्याचें त्यांनीं कां टाळलें ? 'रॉलिन्सन'च्या टीपांकडे लक्ष कां दिलें नाहीं ? अनुवाद इतक्या धांदरटपणें ( अर्थाकडे लक्ष न देतां ) कां केला ? आणि तो अशा निष्काळजीपणानें कां छापविला ? असो.

प्रो. गै यांचें इंग्रजी भाषान्तर मूळ फार्सीवरून आहे. त्यांत त्यांनीं जागोजाग टीपा दिल्या आहेत, त्या अर्थ अधिक सुलभ व्हावा म्हणून. शिवाय जदुनाथ सरकारांचें उपलब्ध भाषांतर आणि हा नवा अनुवाद त्यांत कोठें कोठें फरक आहे तोहि प्रो. गै यांनीं टीपांत व्यक्त केला आहे. किंबहुना त्यांनीं अधिक टीपा द्यावयास पाहिजे होत्या. ह्या अनुवादास विवेचक प्रस्तावना प्रा. श्रीमती कुसुम पारेख यांची आहे. अशीच विवेचक प्रस्तावना " पानि( नी )पत संग्राम " या साधन ग्रंथाला हवी होती. प्रा. श्रीमती पारेख यांनीं थोडक्यांत अनेक मुद्दे विचारार्थ मांडले आहेत– पण तसें मराठी साधनग्रंथाच्या प्रस्तावनेंत कांहीं आढळत नाहीं श्री. कुंटे यांनीं सुद्धां " लेखकाचें म्हटलेलें " अनुवादकाचें निवेदन आपल्या छोटया पुस्तकाला जोडलें आहे. त्यांत बारा प्रश्न विचारासाठीं मांडले आहेत.

## शुद्धलेखन विचार

**पानिपत** ( सामान्यरूप करतांना क्वचित् **पानपत** ) असें रूढ नांव. पण ग्रंथसंग्रहाच्या प्रकाशनांत पानीपत असें पुष्कळ ठिकाणीं छापलें आहे. पानिपत फार थोड्या जागीं आढळतें.

**काशि (शी) राज (य)**–याचें नांवहि दोन प्रकारें एकाच पुस्तकांत लिहिलेलें–छापलेलें आढळतें. या लेखांत **काशिराज** असें लिहिलें आहे.



अनुक्रमणिका






प्रा. श्रीमती पारेख यांचा मुद्दा असा कीं काशिराजानें १९ वर्षांनंतर लिहिलेली ही बखर कोणाच्या तरी सांगण्यावरून लिहिलेली दिसते (पृ. १८ प्रस्तावना) हा विचार मराठी अनुवाद करणारांला सुचला नाहीं हें आश्चर्य! काशिराजाचें भरतवाक्य असें आहे: "मराठ्यांचें गर्वहरण करून त्यांचा निकाल लावण्याकरतां परमेश्वरानें शहा दुराणीला आणिलें" (पृ. १०७. पा. संग्राम) ह्या वरून श्रीमती पारेख म्हणतात त्या संशयाला पुष्टि मिळते. शिवाय मेजर जेम्स ब्राऊन यानें त्या बखरीचा प्रथम इंग्रजी अनुवाद केला, तो स. १७९९ मध्यें प्रसिद्धहि झाला. त्या ब्राऊनसाठीं काशिराजाच्या फार्सी बखरीची जी नकल केली होती ती "नष्ट" झाल्याचें प्रो. रॉलिन्सन यांनीं (ब्राऊनच्या अनुवादाच्या पुनरावृत्तींत) म्हटलें आहे. (मुंबई युनि० साठीं आक्स्फर्ड युनि० प्रेस प्रकाशन, मुंबई १९२६) ब्राऊन दिल्लीच्या आसपास कांहीं वर्षें नाजुक कामगिरीवर होता. तेव्हां त्यानें याबाबतींत कांहीं 'कामगिरी' बजावली कीं काय? कारण ह्या ब्राऊनचा आगापिछा कांहींच सांपडत नाहीं. वॉरन हेस्टिंग्ज परत गेला तेव्हां तो परत गेला, एवढें कळतें. काशिराजहि उतार वयांत कुणाचा आश्रित होता, काय करीत होता, केव्हां मृत्यु पावला इत्यादि माहिती कळल्या शिवाय ह्या रास्त शंकेचें निराकरण होणार नाहीं. श्रीमती पारेख यांचे या जागरूकतेबद्दल आभार मानले पाहिजेत.

> "हें राज्य हिंदी रहिवाशांचेंच असलें पाहिजे—तेच येथील राज्यकर्ते राहिले पाहिजेत"—या तत्त्वासाठीं मराठे पानिपतास लढले.
>
> —प्रा. शेजवलकर

पानिपत संबंधीं लिहितांना 'काला'चें अवधान मोठमोठ्या जाणत्यांनाहि नसतें असें स्पष्ट कळून येतें. एक 'घडी' (=घटि) म्हणजे एक 'तास' असें जदुनाथ सरकार समजून चालत होते. पहिल्या आवृत्तींत (फॉल ऑफ दि मुगल एम्पायर—(१९३४) भाग २) झालेली आपली चूक त्यांनीं दुरुस्त केली. शुद्ध अष्टमीला चंद्रास्त मध्यरात्रीस होतो हेंहि जदुनाथांच्या त्या वेळीं लक्षांत आले नाहीं. प्रो. गै यांचीहि घडी–प्रहर याबाबत कांहीं तरी निराळी समजूत असावी. एरवीं घडी = साडेबावीस मिनिटें अशी टीप (पृ. १७ इंग्रजी अनु.) त्यांनीं दिली नसती. पंचांगी गणनेनुसार (२४ तास =) अहोरात्र = आठ प्रहर = ६० घटिका, हें कोष्टक लक्षांत ठेवल्यास पुढील गणित सोपें वाटेल. चंद्रोदयांत रोज सुमारें दोन घटिकांचा उशीर होतो—(= ४८ मिनिटें) म्हणून शुद्ध अष्टमीचा चंद्रास्त मध्यरात्रीं तर वद्य अष्टमीचा चंद्रोदय मध्यरात्रीं होतो. भरति–ओहटीचें गणितहि असें रोज नेमक्या मिनिटांनीं बदलून मांडावें लागतें.

दिनमान सूर्योदयापासून मोजण्याची आमची रीत; दिल्लीकडील प्रदेशांत सूर्योदयाच्या–सूर्यास्ताच्या वेळा (पानिपत समर समयीं) इत्यादि कालावधान प्रा. शेजवलकरांनीं जितकें सूक्ष्म आणि साक्षेपी राखलें आहे तितकें इतर कुणाला राखतां आलें नाहीं. त्यांच्या विवेचनाचें खास महत्त्व हेंच सांगतां येईल, असो.

दिनमान–कालमान यांच्या संबंधीं लिहितांना साधन–ग्रंथांतील (= पानिपतचा संग्राम) कांहीं अनास्था संपादक–द्वयांच्या नजरेस आणावयाची आहे. त्यांचें पहिलेंच पत्र शके १६८१ चें (= १६–सप्टें. १७६०) म्हणून छापलें आहे. ह्यांत एका वर्षाची तफावत पडते. शके १६८२ पाहिजे. पृ. ९ वरील कार्तिक शु. ७ चें पत्र पुढील आश्विन व. १३; कार्तिक शुद्ध १,२ आणि कार्तिक शुद्ध ६ (पृ. १०–१३) यांच्या आधीं छापलें आहे. अर्थात् पृ. ९ वर दिलेली ता. ३ नोव्हेंबर ही सपशेल चूक होय. कार्तिक शुद्ध ६ ची तारीख १४











नोव्हें. असतां, पुढल्या मितीची तारीख ३ नोव्हें. कशी येईल असाच प्रकार माघ शुद्ध १ च्या पत्राबाबत (पृ. २३) झाला आहे. त्याच्या आधीं पौष वद्य ९ चें पत्र (पृ. २४) छापलें पाहिजे. माघ शुद्ध ९ ता. १३ फेब्रु. येते. (पृ. २६) तर माघ शुद्ध १; १९ जानेवारीस कशी येईल ? कारण १४ जानेवारी (= पौष शुद्ध अष्टमी) हा आगखडा भक्कम आहे. पृ. २७ वर फाल्गुन शुद्ध ४ चें पत्र छापलें आहे. त्याचा क्रम वास्तविक माघांतलीं चार पत्रें छापल्यानंतर यायचा. (पृ. २९–३१). माघ शुद्ध ९ स १३ फेब्रु. ही तारीख असतां सात दिवसांनीं–२० फेब्रु. रोजीं फाल्गुन शुद्ध ४ येईल कशी ? सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे पृ. ३१ वर दोन पत्रें एकाच मितीचीं–माघ वद्य १२ चीं–एकाच लेखकाकडून आलेलीं–छापलीं आहेत. एकावर तारीख आहे २४ फेब्रु. आणि दुसऱ्यावर २ मार्च!! एकूण सोळा पत्रें मितीप्रमाणें लावतांना इतक्या चुका व्हाव्या–त्या लक्षांतहि येऊं नयेत, शुद्धिपत्रहि त्यांसाठीं नसावें–हा आमच्या संशोधनाचा कमीपणा होय.

प्रत्यक्ष संग्रामाची तारीख देण्याबाबतहि विविध प्रकार व्हावे हें आश्चर्य नव्हे तर काय ? कुंटे यांनीं अक्षरीं " सात जानेवारी " (स. १७६१) अशी ती दिली (पृ. ३४) तेव्हां रॉलिन्सनची टीप त्यांच्या नजरेंतून सुटली. पण श्री. सेतुमाधवरावांच्या अनुवादांतून " संवत " हा शब्द गळाला. त्यामुळें झालें काय तर " पौष शुद्ध अष्टमी १८१७ बुधवारीं " (पृ. ९६) असें मोघम छापलेलें आढळतें. प्रो. गे यांचा इंग्रजी अनुवाद पाहिल्यावर (पृ. २३) हा आंकडा (विक्रम) संवताचा आहे असें कळतें. वास्तविक साधनें उपलब्ध करतांना त्यांतील मूळ मिती-तारीख तशीच ठेवून तिला जुळती इंग्रजी तारीख वेगळी दिसेल अशी छापावी, हा आतांपर्यंतचा शिरस्ता प्रस्तुत इंग्रजी–

## पानिपत–संग्राम
### (कालपट)

स. १७६०–

जाने. १० दत्ताजी शिंदे मृ. (बरारीघाट)

मार्च १४ सदाशिव भाऊंचें उत्तरेकडे प्रयाण (पटदुराहून)

जून ८ भाऊ चंबळपार

जुलै १३ ,, गंभीरपार

ऑगस्ट २ ,, दिल्ली काबीज

ऑक्टो. ८ ,, दिल्लीहून प्रयाण–कुंजपुऱ्याकडे

,, १७ कुंजपुरा काबीज.

डिसें. ७ बळवंतराव मेहेंदळे मृ.

,, २० गोविंदपंत बुंदेले मृ. (?)

स. १७६१

जाने. ६ पाराशर दाजीचा खजिना अब्दालीस हस्तगत.

जानेवारी १४ (पौष शु॥ अष्टमी बुधवार) } संग्राम

१७६० डिसें. २७ – पेशव्याचें लग्न

१७६१ जाने. २४ -- पेशव्यास पानिपतची खबर कळली (मु. भेलसा)

जून २३ – पेशवा मृ. पुणें–पर्वती

---

मराठी अनुवादांत कोठेंच अवलंबिलेला दिसत नाहीं.

एका भाषेंतून दुसरींत अनुवाद करतांना अभावितपणें विनोद साधतो. मूठभर केशराचें उदाहरण दिलें तें नुसत्या मराठी अनुवादकाचें नव्हे. ब्राऊनचीच ती चूक म्हटली पाहिजे. पण मराठी अनुवादकाच्या लक्षांत ती कां आली नाहीं ? तशीच कांहींशी अवस्था आणखी एक दोन वाक्याबद्दल झाली आहे. " मराठ्यांचा धुव्वा कसा उडवतों तें पहा " असें इंग्रजी (पृ. ८) आणि मराठी पृ. ८५) अनुवादांत असतां कुंटे लिहितात (पृ. १५)








"मी तुम्हांला मराठ्यांच्या क्रौर्याचे नमुने दाखवितों." त्यांचें असेंच दुसरें वाक्य कुतूहलजनक ठरलें म्हणून तिन्ही अनुवाद ताडून पहावे लागले. पृ. ३० वर कुंटे म्हणतात – "मराठयांची जात मोठी हरहुन्नरी आहे." मराठयांना हुन्नरबाजीचें हें सर्टिफिकीट नसून "कोल्ह्याच्या वृत्तीचे" ( इंग्रजी पृ. २० मराठी पृ. ९४ ) याला प्रतिशब्द म्हणून कुंटे यांनीं हरहुन्नरी म्हटलें. ब्राऊननें क्राफ्टी असें इंग्रजीत म्हटलें आहे. त्याचा पर्याय हुन्नरबाजींत झाला.

अनुवादांत कांहीं ठिकाणीं मोठी विसंगति आढळते. तिघांच्या तीन तऱ्हा म्हणतात– तसा प्रकार बिचाऱ्या काशिराजाच्या वाटणीस आला. हा नमुना पहा. ––

(कुंटे)
पृ. १५.
"त्यानें २८० शिपायांना कैद करविलें, त्यांच्या नाकांत बाण मारून भोकें पाडलीं आणि त्यांत 'दोर' अडकवून तशाच स्थितींत उंटासारखें त्यांना शुजाकडे नेलें"

( प्रो. गै ) "सुमारें दोनशें दुराणी शिपायांचे कान
पृ. ८. आणि डोकीं कापलीं. त्यांनीं कांहीं तरी आगळीक नबाबाच्या छावणींत केली होती."

( सेतु. मा. प. ) "शुजा उद्दौल्याच्या छावणींत कांहीं
पृ. ८५. दुराणी शिपायांनीं दांडगाई केली. त्या– (ती) बद्दल अहमदशहानें दोनशें शिपायांना शिक्षा केली."

–प्रा. शेजवलकरांना फक्त ब्राऊनचें मूळ इंग्रजी उपलब्ध होतें– त्यांनीं त्याचा उल्लेख आपल्या 'पानिपत' ग्रंथांत केला ( पृ. १४६ ) आणि म्हटलें "अशी शिक्षा कोणत्याहि मराठ्यानें सोसली असती असें वाटत नाहीं. आतां ह्या इतर दोन अनुवादांवरून त्यांचें मत काय होतें, तें पाहिलें पाहिजे. कारण इतर दोघांचा अनुवाद एकाच मूळ फार्सी प्रतीवरून केला आहे.

दुसऱ्याहि एके ठिकाणीं तिघांच्या तीन तऱ्हा आढळल्या. कुंटे म्हणतात ( पृ. ३५ ) "तोफखान्याला आणि गोलंदाजांना भडिमार बंद करण्यास सांगितलें." प्रो. गै यांचें म्हणणें असें कीं (पृ.२४) एक क्षणभर देखील तोफाबंदुका यांचा आवाज थांबला नाहीं. सेतुमाधवरावांचा अनुवाद (पृ.९७) असा : "थोडा वेळ तोफांचे आवाज थांबले." अशा त्रिविध अनुवादांमुळें काशिराजाचें खरें मत कोणतें समजावें ? आणखी बारकाईनें छाननी केल्यास गोंधळ अधिक वाढायचा !

> "पानिपताची लढाईसुद्धां मराठ्यांना अभिमानास्पद व कीर्तिस्पद अशीच घटना समजली पाहिजे. 'सर्व हिंदी लोकांसाठींच हिंदुस्थान' या ध्येयासाठीं मराठे लढले."
>
> – मे. इव्हॅन्स बेल

साधन-ग्रंथांत काशिराजाचा प्रभाव पाहिल्यावर इतर साधनें पाहिलीं पाहिजेत. फाटक–सेतुमाधवराव यांच्या संपादनामुळें बरेंच फार्सी साहित्य पहिल्यानें मराठी वाचकांच्या नजरेस पडत आहे, मीरात–ए–अहमदी, खजानाये आमिरा; तारीखे फैजबक्ष, गुलिस्तान–ए–रहमत, गुले–रहमत ......अशीं कितीतरी नवीं नांवें प्रथमच आमच्या पुढें येतात. तीं लिहिण्या–उच्चारण्यांत चुका संभवतील–पण त्यांचें ऐतिहासिक महत्त्व संपादकद्वयांना पटलें असल्यानें, त्यांनीं त्या त्या ग्रंथांतील पानिपत –पुरता भाग या साधन-ग्रंथांत समाविष्ट केला. फार्सीवरून मराठी तर्जुमा अर्थात् सेतुमाधवरावीं सारख्या बहुभाष्याला करावा लागला.

पुरंदरे, पेशवे, या दोन्ही 'दप्तरां'तलीं कांहीं पत्रें, राजवाड्यांच्या खंडांतलीं थोडीशीं, शिंदेशाही इतिहासाचीं साधनें या खंडांतली...आणखीहि कांहीं ठिकाणीं विखुरलेलीं पानिपतशीं निगडित पत्रें, नाना







फडणिसांच्या आत्मचरित्रांतील आवश्यक तेवढा भाग,...असे उपलब्ध पण संबद्ध कागद या साधन ग्रंथांत आहेत. पानिपत विषयक अभ्यासकांची सोय अशानें चांगली साधते खरी; परंतु उभय-संपादकांच्या 'नजरगुजारी'मुळें या साधन ग्रंथांची आबाळ अधिक झालेली दिसते. ह्या आबाळीमुळें ग्रंथाची उपयुक्तता कमी होते. तारखांची-क्रमाची अवस्था वेगळी दाखविली आहे. अनुवादाबद्दलहि एक दोन नमुने घेऊन लिहिलें आहे. आतां तात्त्विक मुद्यांबद्दल पहा, अशा अनुवादित साधनग्रंथांत संपादकीय 'टीपा' असाव्या कीं नकोत ? अनुवादकांनीं कांहीं ठिकाणीं थोडें बहुत लिहिलें आहे. पण विषमपदविमर्शिनी टीपांचें काम त्या लेखनानें साधत नाहीं. सुमारें ४०-४२ पत्रें या साधन ग्रंथांत प्रारंभीं छापलीं आहेत, तीं कोणांकडून, कुठून, कोणांस, हा स्पष्ट खुलासा पत्रारंभी किंवा अखेरीस संपादकांनीं आपल्या अखत्यारांत छापावा अशी आम्हां वाचकांची अपेक्षा.

पृ. ४ नानांस अपत्यें बालकृष्णानें

पृ. ७ } बजू, गोविंद, बापू या तिघांस
पृ. १३ } त्रिंबक सदाशिवाचे आशी.
पृ. ८ } गोविंद बल्लाळ यास
पृ. ९ पंत स्वामींचे सेवेसी यांस
पृ. १० दिवाकर जोशी यास कृष्णा जोशी कडून
पृ. १५ राघोपंत यास नारो गंगाधर यांचें
,, ,, बाबुराव बाबा यांस बळवंत गणपत याचें
,, १६ नाना यांस लक्ष्मणानें व कृष्णानें

अशा पत्रांवरून नव्या अभ्यासूनें काय समजावें ? नव्यानें सर्व साहित्य ज्या हेतूंस्तव एकत्र करावयाचें त्याच हेतुपूर्तीसाठीं—कुणाकडून, कुणाला याचा नीट संबंध सांगून, त्या पत्राचें महत्त्व कां, हेंहि स्पष्ट करणें जरूर आहे. 'प्रयोजनमनुदिश्य' पत्रें छापलीं नाहींत ना ? मग त्यांबद्दल एवढी अनास्था कां असावी ? 'पेशवे दप्तरांतल्या प्रत्येक पत्राखालीं दिली आहे तेवढी तरी अधिक माहिती देण्यास हरकत नव्हती. पृ. ६—७ वरील पत्र पहा. अर्ध्याहून अधिक पत्र छापून झाल्यावर ७ व्या पानावर टीप आहे : "हें पत्र असेंच अर्धेंमुर्धें सांपडलें." आमची अपेक्षा अशी कीं ही टीप पत्राच्या मध्यें कुठेंतरी न छापतां प्रारंभीं अगर शेवटीं छापावयास हवी होती.

मुद्रण दोषांकडे डोळेझांक करूनहि म्हणावेंसें वाटतें कीं पृ. ३१ वर काशिराजाचें ( पे. द. २-१४८ ) पत्र छापलें आहे, त्यावर 'सेवक पदरचा आहे" हा मजकूर कुठला ? कारण पेशवे दप्तर खंडांत ह्या पत्राचा ठसा आढळतो. त्यावर हे तीन शब्द दिसत नाहींत. त्याचप्रमाणें पे. द. २१-१९३ ( पृ. ४-५ ) या पत्रांत तीन शब्द गळलेले दिसतात, ते चुकून गळाले कीं त्याचें महत्त्व वाटलें

## पानिपत साहित्याचें मोल

जदुनाथ सरकारांनीं आपल्या "मोगल साम्राज्याच्या अस्तां" त पानिपत प्रकरण दुसऱ्या खंडांत लिहिलें आहे. तें लिहीत असतां त्यांनीं वेळोवेळीं रियासतकार सरदेसायांस आपल्या कामाची प्रगति कळविली. ता. ८ डिसें. १९३३ च्या पत्रांत जदुनाथ लिहितात : अबदालीच्या ( स. १७५७ च्या ) स्वारीची हकीकत मी लिहीत आहे. पंधरा दिवसांत पानिपतची मोहीम ( लिहिण्यास ) सुरवात होईल. उपलब्ध विश्वसनीय फार्सी साधनांचा इंग्रजी अनुवाद मी करीत आहे. तो माझ्या ( दुसऱ्या खंडांत ) समाविष्ट होईल. हीं फार्सी साधनें फोटोरूपानें मीं लंडनहून मिळविलीं आहेत. त्यांची मुद्रणप्रत करण्यासाठीं, छपाईसाठीं कुणीं रु. ३२०० ( बत्तीसशें ) देणारा दाता भेटला तर पुस्तक रूपानें हीं साधनें छापतां येतील. पण असा "छत्रपति" आहे कुठें ? माझा अनुवाद पेन्सिलीनें—कुठें शाईनें—लिहिला आहे तसाच तुम्हाला तो वाचायला मिळेल.







नाहीं ? खंडेराव दरेकर व हैबतराव जाधव मुइंज-कर यांना गोळीची जखम झाल्याचा उल्लेख आहे तेथें "परंतु हलकीच आहे" ( = जखम मोठी नाहीं. छोटी आहे ) असें मुळांत आहे. पृ. १५ वरील पे. द. २१-१९५ हें पत्र मुक्काम दौंडहून लिहिलें असें मुळांत आहे; त्या ऐवजीं "दाड" असें छापलेलें दिसतें. मुद्रण दोष समजावयाचा कीं दुरुस्ती ?

विविध ग्रंथांतील एकत्र केलेल्या पत्रांना 'टीपा' अवश्य ( द्यावयास ) पाहिजे होत्या. पृ. २० वर 'गोविंदपंताच्या मृत्यूची बातमी' या मथळ्या-खालीं छापलेल्या पहिल्याच भाऊंच्या पत्रांत गोविंद-पंतांची खबर त्याला कळलेली दिसत नाहीं. नाहींतर गोविंदपंतांच्या मुलाला लिहितांना सांत्वनपर अधिक स्पष्टपणें भाऊनें लिहिलें असतें. त्या नंतरच्या म्हणजे २४ डिसेंबरच्या पत्रांत सुद्धां गोविंदपंत "पळाले कीं कामास आले" हें ठीक कळलेलें दिसत नाहीं. चार दिवसानंतरच्या नानांच्या पत्रांत मात्र ही खबर निश्चितपणें येते. गोविंदपंत बुंदेले यांचें शिर, भाऊनें संस्कारपूर्वक दहन केलें. पुढें भाऊंचाहि असाच संस्कार ( प्रथम धडाचा आणि नंतर शिराचा ? ) झाला असावा. अनुपगीर गोसावी याचें ता. २१ फेब्रु. चें पत्र ( पृ. २९ ) यासंबंधीं आहे. काशिराजाचीं या खबरीचीं दोन पत्रें आहेत ( पृ. ३१ ) तीं दहा दिवसांनंतरचीं आहेत. अनुपगीरच्या पत्रांत काशिराजाचा उल्लेख आहे; पण काशिराजाच्या पत्रांत अनुपगीरचा निर्देश नाहीं. विशेष म्हणजे बखरींत दिलेली उत्तर क्रियेची हकीकत वेगळी वाटते. या गोंधळावरून काय समजावें, काशिराज कितपत विश्वसनीय आहे, पेशव्यांच्या दरबारीं ही खबर प्रथम कोणाची दाखल झाली, इत्यादि विवेचन संपादकांकडून अपेक्षित होतें. पण त्यांनीं निराशा केली. गोविंदपंताच्या मृत्यूची निश्चित तारीखहि त्यांनीं सांगितली नाहीं. कांहीं महत्त्वाच्या घटना-बद्दल अधिक चिकित्सा होणें जरूर होतें. ... पण ... "आस निरास भई."

> "राष्ट्रांतील अत्युत्तम शिलेदारांसह आपल्या देशाच्या व धर्माच्या शत्रूंशीं लढतांना पानपतावर मराठ्यांनीं जें मरण पत्करलें, त्याहून अधिक गौरवा-स्पद मरण इतिहासांत क्वचितच नोंदलें असेल."
>
> **– प्रो. एच्. जी. रॉलिन्सन**

'पानीपताचें अल्प समालोचन' ह्या प्रस्तावपर लिखाणांत 'शहावली उल्ला'ची माहिती आढळते. पण ती सांगतांना सावधपणाची कमाल झाली आहे : "नजीबखानानें आपल्या पदरीं बाळगलेल्या विद्वानांपैकीं अनेक जण, या इस्लामेतर धर्माच्या समाजाचा उत्कर्ष लवमात्र सहन होत नाहीं, अशा स्वभावाच्या शहावली उल्लाचे दोस्त **असण्याचा संभव नाकारतां येण्याजोगा नाहीं.** ( पृ. ८ )

विश्वासरावाला दिल्ली-च्या तख्तावर बसविण्या-च्या उद्देशाबद्दल पुरावा लेखी व्यवहारांत कोठेंहि दृष्टीस पडत नाहीं ( पृ. ९. ) असे फाटक म्हण-तात. पण रियासतकारांनीं म्हटलें आहे : "विश्वासरावास पुढें करून भाऊसाहेबानें (दिल्लीच्या) किल्ल्यांत प्रवेश केला ... **दरबार भरवून त्यानें सर्वांकडून विश्वासरावास नजरा करविल्या.** (मराठी रियासत : ६ पेशवा बाळाजीराव : मुंबई १९५३ पृ. ३६६ ) असो.

फार्सी लेखांचे तर्जुमे करतांना मूळ पृष्ठ निदर्शक आकडे मिराते अहमदीत दिले आहेत, ( शहा-अलमनामा, तारीखे हुसेनशाही, तारीखे अहमद यांतहि आहेत ) तसे काशिराजाच्या बखरीच्या ( इंग्रजी ) मराठी अनुवादांत आढळत नाहींत. विशेषतः जदुनाथ सरकारांचा अनुवाद कोठें चुकला किंवा त्यांनीं कोणता मजकूर गाळला, हें सांगणारांना जदुनाथांनीं मुद्दाम दिलेल्या टीपा दिसल्या नाहींत












कीं काय ? मिराते अहमदीच्या अनुवादांत ( छेदक ५९६ पृ. ५३ ) शुजाउद्दौला आणि नजीब उद्दौला यांचा पराक्रम वर्णिला आहे. तो **सपशेल चूक** असा शेरा जदुनाथांनीं आपल्या इंग्रजी अनुवादांत दिला आहे. ( सरदेसाई स्मारक ग्रंथ इंग्रजी – पृ. २६० ) तसा मराठी संपादकांनीं–अनुवादकांनीं दिला नसल्यानें अभ्यासकांची गैरसोय होते.

आणखी एकच प्रश्न तपासावयाचा : बळवंतराव मेहेंदळे हा सदाशिवराव भाऊचा मेहुणा असा उल्लेख काशिराजानें केला आहे. ( मराठी अनु. पृ.९२ ) इं. अनुवादांत टीप आहे तींत म्हटलें आहे कीं सर जदुनाथांच्या आणि ब्राऊनच्याहि अनुवादांत मेहुणा म्हटलें आहे; पण ते (चुलत) भाऊ (कझिन्स) होते. (पृ.१३) 'खजानाये आमिरा'च्या मराठी अनुवादांतहि ( पृ. ५८) ह्या मेहुणेपणाचा स्पष्ट उल्लेख येतो. याच्या उलट रियासतकार मुद्दाम बजावतात कीं– " हा नाना फडणिसांचा मामा–**भाऊचा श्यालक नव्हे**" ( मराठी रियासत : ६ पेशवा बाळाजीराव : मुंबई १९५३ पृ. ३९२ तळटीप). तेव्हां संपादकांनीं –अनुवादकांनीं या बाबत कांहीं तरी निश्चित सांगणें आवश्यक होतें कीं नाहीं ? जाणत्यांनीं निर्णय द्यावा. पुनः एवढेंच कळवावयाचें कीं नवोदित अभ्यासकांचा घोटाळा होऊं नये म्हणून संपादकांनीं खबरदारी घ्यावी ही अपेक्षा. इतर संपादकांस जें साधतें तें आमच्या संपादकद्वयांस साध्य नव्हतें असें नाहीं. पण त्यांनीं तें केलें नाहीं, म्हणून वाचकांची गैरसोय होते एवढें मात्र खरें. संदर्भग्रंथ संक्षेपांचा खुलासा देखील अधिक तपशीलवार संपादक–प्रकाशक–प्रकाशनकाल–स्थळ--यांसह हवा होता. आहे तो अपुरा आहे.

'काचं मणिं कांचनम्" एक सूत्रांत गोवण्याचा बालिश प्रयत्न 'बाला' करते असें सुभाषितकार म्हणतात. तद्वत् दर्जे अव्वलचें साहित्य दुय्यम आणि सिय्यम् दर्जांच्या साहित्याबरोबर ह्या ग्रंथांत

**अबदालीच्या हिंदुस्थानवर स्वाऱ्या**

| | |
|---|---|
| १ | डिसें. १७४७ – मार्च १७४८ |
| २ | डिसें. १७४८ (?) |
| ३ | ऑक्टो. १७५१ – एप्रिल १७५२ |
| ४ | नोव्हें. १७५६ – एप्रिल १७५७ |
| ५ | सप्टें. १७५९ – मार्च १७६१ |
| ६ | फेब्रु. १७६२ ? |
| ७ | ऑक्टो. १७६४ – मार्च १७६५ |
| * ८ | नोव्हें. १७६६ – मार्च १७६७ |
| ९ | जाने. १७६९ |

* स्वाऱ्यांच्या तारखाबाबद थोडा मतभेद आहे. हिंदुस्थानची हद्द ठरली नसल्यानें अबदालीनें हिंदुस्थानांत प्रवेश कुठें केला,–जातांनाहि त्यानें हिंदुस्थान सोडलें असें कुठें समजावें – याबद्दल निश्चिति नाहीं. प्रो. गंडा सिंग यांच्या मतानें वरील माहिती बरोबर आहे. पण डॉ. हरि राम गुप्ता नोव्हें. १७६६ च्या स्वारीस ९ वी म्हणतात. स. १७६२ पासूनच्या स्वाऱ्या पंजाब काश्मीर या भागांत झाल्या. दिल्लीपर्यंत दुराणी नंतर पोचला नाहीं असें दिसतें.

ग्रथित केलें हें ठीक नाहीं. अनुवादासाठीं 'ग्रंथ' निवडले, त्यांतहि तारतम्य पहावयास हवें होतें. कुणाच्याहि चरित्रांत, कुणाच्याहि काव्यांत, पानिपतचा उल्लेख आला ( आणि तें साहित्य अप्रकाशित असलें अथवा अनुवादित नसलें ) म्हणून तें अव्वल दर्जाचें ठरत नाहीं. अशा साधनग्रंथांत निवड करतांना निकष ठरवावयाचा तो–नवी माहिती, विश्वसनीय आधार, कांहीं सापडतो कीं नाहीं, हा असावा. अनुवादकांचा उत्साह उतू जातो आहे किंवा मुद्रकांची तयारी आहे म्हणून भराभर ऐतिहासिक साधन साहित्य तयार होत नाहीं. तर-तम प्रतवारी लावली असती तर कांहीं पत्रें व बरेंचसें अनुवादित साहित्य या संग्रहांतून कमी झालें असतें.

प्रा. शेजवलकरांचा ग्रंथ विवेचनात्मक आहे. सुमार तीन साडेतीन तपांच्या अभ्यासाचें हें सार म्हणतां येईल. पानिपतच्या ह्या प्रचंड संग्रामाचें इतकें सुस्पष्ट, आणि समजून केलेलें वर्णन अन्यत्र आढळणार नाहीं. कारण तो प्रदेश बारकाईनें पाहिल्यानंतर, स्वतः त्या मुलखांत हिंडल्यानंतर, उपलब्ध (प्रकाशित- अप्रकाशित) साहित्याचा सूक्ष्म अभ्यास केल्यानंतर, त्यासंबंधीं दीर्घ काल चिंतन केल्यानंतर त्यांना जणु दिव्य दृष्टि प्राप्त झाल्यासारखी वाटते. इतकें स्वाभाविक वर्णन प्रा. शेजवलकरांचें आहे. मुख्य म्हणजे देश, काल, पात्रें, यांचा त्यांनीं अभ्यास फार छान केला. किंबहुना त्यांच्या इतकी देशाची आणि कालाची माहिती इतर अभ्यासकांत आढळली नाहीं. म्हणून प्रा. शेजवलकरांचा हा ग्रंथ फार श्रेष्ठ दर्जाचा आहे. पानिपतच्या संग्रामाची संगतवार माहिती त्यांनाच ठाऊक झाली असल्याचें प्रत्यंतर म्हणजे त्यांनीं ह्या ग्रंथांत दिलेले **नकाशे**. असे नकाशे अद्यापपर्यंत इतर कुणींच दिलेले नसल्यानें प्रा. शेजवलकरांचा मान याबाबतींत अग्रणीचा आहे.

इतर दोष किंवा खास वैशिष्टयें कांहींहि असलीं तरी "पानिपत-१७६१" हा शेजवलकरांचा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे. आम्हां मराठ्यांचा इतिहास बहुतेक इतरांनीं लिहिला आहे. पण आमचें मनोगत फारसें कुणाला उमगलेलें दिसत नाहीं. आमच्यांत इतिहासकार असे झाले आहेत कुठें ? विपर्यस्त इतिहास सफाईदार इंग्रजीच्या जोरावर किंवा अधिकारी वशिल्यानें भराभर फैलावतो. आणि आमच्याबद्दल अपसमज बळावतात. ह्या अपसमजाचा परिणाम आमच्यापैकीं पुष्कळांवर होतो आणि आमचें आम्हांसच कळत नाहीं कीं यांत खरें काय आणि खोटें काय समजावें ? अशा वेळीं शेजवलकरांसारख्यांनीं खंबीरपणें-आपलें म्हणणें साधार मांडलें-आमचा राष्ट्रीय दृष्टिकोन स्पष्ट केला-आणि आमच्या बद्दलच्या अपसमजाचें आपल्या परीनें निराकरण केलें हें राष्ट्रोपयोगी कार्य होय. पानिपतचें मातब्बर झुंज हें मराठे-गिलचे यांच्या मधील झुंज नसून भारतवर्षीय विरुद्ध काबूलकंदाहार मधील अफगाण पठाण व त्यांचे अत्रस्थ रोहिले पक्षपाती अशांमधील होतें. भारतवर्षीयांच्या विरुद्ध पक्षीयांत एतद्देशीयहि कांहीं मंडळी होती* ही बाब महत्त्वाची नाहीं. विशिष्ट तत्त्वासाठीं, राष्ट्रीयत्वासाठीं-मराठे लढले, हें मुद्दाम लक्षांत घेतलें पाहिजे. नामधारी बादशहानें देऊं केलेल्या मोबदल्याच्या लालचीनें मराठे लढले नाहींत, हेंहि उघड आहे. कारण एकाद्या तत्त्वासाठीं, राष्ट्रकार्यासाठीं आपण लढत आहोंत याची जाणीव मराठ्यांना होती. 'पातशाही' टिकविणें हा मूर्खपणा असेल कदाचित्. असलें चुकीचें ध्येय पत्करल्याबद्दल वाद होईल. पण तें पत्करल्या नंतर प्राणपणानें त्यासाठीं झुंजण्याची निष्ठा मराठ्यांनीं दाखविली- नव्हे सिद्ध केली. आणि या आमच्या पूर्वजांच्या मर्दुमकीचें यथार्थ दर्शन आम्हांस घडविणारे शेजवलकर अभिनंदनास पात्र आहेत.

> "पानिपतावर मराठ्यास जयप्राप्ति झाल्यानें जें कार्य झालें नसतें तें त्यांच्या संहारानें त्यांना सिद्ध करून दिलें...... पानपतचा संग्राम मराठ्यांची कीर्ति यावच्चंद्रदिवाकरौ उज्ज्वल राखील. कितीहि राज्यक्रांत्या किंवा घडामोडी झाल्या तरी पानपतच्या आठवणीनें मराठ्यांच्या बाहूंस सदैव स्फुरण चढेल"
>
> **— रियासतकार सरदेसाई**

पानिपतच्या ह्या तिसऱ्या संग्रामाची इतकी सविस्तर माहिती अद्यापपर्यंत कुणालाच जमवितां आली

* कुमाऊंमधील 'पंत', (गोविंद वल्लभ पंतांचे पूर्वज) या संग्रामांत रोहिल्यांच्या पक्षांत होते — मराठे असूनहि मराठ्यांविरुद्ध होते, हें स्वतः गो. व. पंत सांगत असत.

नाहीं. ' मिलिटरी हिस्टरी ऑफ इंडिया ' म्हणून जदुनाथ सरकारांचें पुस्तक (निधनोत्तर) प्रसिद्ध झालें, त्यांत त्यांनीं शिकंदरच्या स्वारीपासूनच्या २२ लढायांची अभ्यासपूर्ण माहिती सांगितली आहे. पण त्यांत पानिपतच्या ह्या अपूर्व संग्रामाचा समावेश नाहीं. याचें मुख्य कारण असें दिसतें कीं सविस्तर तपशील त्यांना मिळाले नसावे. पण शेजवलकरांनीं ह्या लढाईची संपूर्ण माहिती मिळविली -- हें त्यांच्या साक्षेपी, चिकित्सक आणि चौकस अभ्यासाचें फल होय. मराठ्यांच्या इतिहासाची माहिती शेजवलकरांना जितकी आहे तितकी इतर कुणाला असेलसें वाटत नाहीं. म्हणूनच 'हेग' कोर्टांत पोर्तुगीझांशीं आमचा तंटा चालू होता, त्यांतहि शेजवलकरांच्या पक्व ज्ञानाचा, अभ्यासाचा, विवेचनाचा, उपयोग झाला असल्याचें आम्हांस ठाऊक आहे. अशा मुरब्बी अभ्यासूनें "पानिपत-१७६१" लिहून मराठी इतिहास-ग्रंथांत मोठी मोलाची भर तर घातलीच आहे. पण तमाम राष्ट्राला त्या गतेतिहासाकडे पहाण्याची नवी दृष्टि दिली आहे. ह्या पुस्तकाचा अनुवाद अनेक भाषांत सहज झाला असता; पण शेजवलकरी वैशिष्ट्यांमुळें हें पुस्तक समग्र वाचण्यास बरेचजण तयार होणार नाहींत. हीं त्यांचीं वैशिष्ट्यें खास शेजवलकरी पद्धतीनें व्यक्त होत असतात. मराठ्यांच्या तीन चुका त्यांनीं सांगितल्या त्या अशा—

१. संपूर्ण दक्षिण मराठ्यांची करण्यापूर्वीं नर्मदा ओलांडणें ही पहिली;

२. चंबळेपर्यंत पोचल्यावर दिल्लीच्या राजकारणांत हात घालणें ही दुसरी; आणि

३. अंबाल्यापुढें येऊन गुप्त व लुप्त प्राचीन सरस्वती नदी ओलांडणें ही तिसरी चूक. (पृ. १९)

ह्या तिन्ही चुकांचा थोडा जरी विचार केला तरी त्या सांगणाराची चूक लगेच समजते. एवढें असलें तरी त्या चुकामुळें सदैव अभिमान बाळगण्यासारख्या गोष्टी पदरांत पडल्या—अमर कीर्ति लाभली ! ! शेजवलकरच म्हणतात : ' हिंदुराष्ट्रानें सिंधुपार (अटकेपार) होण्याचा पराक्रम केला ही मराठ्यांना सदैव अभिमान बाळगण्यासारखी गोष्ट घडली यांत संशय नाहीं ! " (पृ. २०) एवढेंच नव्हे तर, " मराठ्यांच्या अटकेपार पराक्रमाचे दुसरे काय परिणाम असतील ते असोत, पण त्यानें त्यांना अमर कीर्ति लाभली यांत संशय नाहीं. " (पृ. १४३) तीन चुका पाठोपाठ केल्या म्हणून सदैव अभिमान बाळगण्यासारखी गोष्ट " घडली " किंवा अमर कीर्ति " लाभली " कीं काय ? पण ह्या अटकेपार जाण्याचा अविचार (पृ. ५९) मराठ्यांनीं केलाच ! आणखी एक उदाहरण पहा— " गंगा यमुनांच्या व सतलज रावींच्या कांठच्या सुपीक प्रदेशाचें राज्य करण्याची संधि गमावून मरुभूमींत राज्य करण्याची खोटी इच्छा मराठ्यांनीं धरली आणि तीहि परिपूर्ण होऊं शकली नाहीं, हाच मराठी साम्राज्याचा इतिहास झाला आहे (पृ. ८७). पुनः पहिल्या तीन चुकांच्या आधारावर उभें राहिल्या खेरीज सतलज-रावी किनारीं राज्य कसें करतां येईल, याचा विचार – करावा म्हणजे शेजवलकरांचें लेखन-वैशिष्ट्य नीट समजेल. मराठ्यांनीं मारवाडांत 'राज्य स्थापण्याची ' हौस धरली होती काय ? असा प्रश्न स्वतःसच विचारून पहावा. आपल्याच विधानाला किंवा शंका आशंकांना आपणच उत्तरें देऊन पहिलीं विधानें -- शंका खोट्या पाडण्याची हातोटी शेजवलकरांना चांगली साधते. शेणवई, देशस्थ, कोंकणस्थ यांच्या आपसांतल्या कारवाया (पृ. १३५) त्यांनीं सांगितल्या तशा बुंदेले यांच्या निमित्तानें कोंकणस्थ -- कऱ्हाडे वादाचा उल्लेख झाला (११९–२०). याच वादाचें एक आंग म्हणून राजवाडे यांजवर कडाडून हल्ला. ह्याची ओळख पहिल्या प्रकरणांत दुसऱ्या पानापासून होते. राजवाडे यांनीं भट-कुल-बादशाहीचा डोलारा






उभारण्याचा प्रयत्न केला; तो कसा कोसळला—जमीनदोस्त झाला— हेंहि (पृ. ४) शेजवलकरांनीं दाखविलें आहे. भाऊच्या बरोबरच्या बाजार बुणग्यांचा वारंवार उल्लेख, यात्रा, तीर्थक्षेत्रें, यांबद्दल कुत्सित निर्देश, पेशव्याच्या विवाहाबद्दल विस्तृत (पण अप्रस्तुत) चर्चा (पृ. १३७–३८) शिंदे—होळकरांच्या आपसांतील भांडणाचें स्वरूप.... इत्यादि अनेक उल्लेख तात्त्विक दृष्ट्या वाद करण्यासारखे नाहींत. हीं शेजवलकरांचीं खास मतें आहेत. पण ऐतिहासिक विवेचनाला बाधा येईल अशीं मतें त्यांनीं मांडलीं आहेत, त्यांची तेवढी चर्चा करावी असें योजलें आहे.

अशा वादग्रस्त मतांपैकीं मुख्य म्हणजे अबदाली हा "अफगाण शिवाजी" होता हें. त्याला म्हणे पेशवे व इतर मराठे "खान" म्हणत—हा त्यांचा केवढा अडाणीपणा! त्या शिवाजीचा हा केवढा उपमर्द!! आणि त्याची चीड मात्र शेजवलकरांना!!! "अहंमदखान वाटणारा माणूस शहा तर केव्हांच झाला होता." शिवाजीप्रमाणें अफगाणिस्तान या नवीन स्वतंत्र देशराज्याचा संस्थापक होता! त्याने कायम केलेलें राज्यच आज दोनशें वर्षें जगाच्या नकाशावर स्वतंत्र देश म्हणून ओळखलें जात आहे." (पृ. १५) अफगाणिस्तानला स्वातंत्र्य मिळालें तें १९१९ सालापासून, असा इतिहास आम्हांस ठाऊक आहे. तत्पूर्वीं सुमारें ७५ वर्षे ब्रिटिशांच्या हातचें बाहुलें "अमीर" म्हणून काबुलांत रहात असे. प्रा. शेजवलकरांची अफगाण-स्वातंत्र्याबद्दल कांहींतरी भलती कल्पना दिसते. त्यांचा अफगाण शिवाजी क्रौर्यांत नादिरशहालाहि मागें टाकणारा होता; बायकांबाबत त्याच्या हव्यासाला मर्यादा नव्हती; आणि नादिरशहाने त्याचे "कान कापले होते" (पृ. १८४) तो स्वत: विशेषसा लोकप्रिय नसल्यानें (!) अफगाणिस्तानच्या वायव्य भागावर नादिरशहाच्या नातवाचा आणि काबूलवर आपल्या मुलाचा अधिकार जाहीर करून आपण कंदाहारमध्यें रहात होता. यांत शिवाजीच्या कोणत्या एका गुणाचें तरी साम्य आढळतें काय हें शिवभक्तांनीं सांगावें. खुद्द अफगाणदेखील अब्दालीला जो मान देत नाहींत तो शेजवलकर त्यांस बहाल करतात—आणि स्वजनांचा मात्र कुत्सितपणें तेजोभंग करतात, मोठें आश्चर्य आहे! भाऊ, पेशवे, मराठे यांच्या यात्रा, धार्मिक वृत्ती, तीर्थस्नानांचा विचार हा शेजवलकरांच्या कुत्सेचा विषय व्हावा; आणि अब्दालीनें मात्र तसें धार्मिक कांहीं कृत्य केलें कीं ती कुत्सा कुठें पार पळते. यमुनेनें उतार द्यावा म्हणून अब्दालीनें "कुराणांतील वाक्यें कोरून चांदीचे किंवा तांब्याचे पत्रे, ईशस्मरण करून" नदींत सोडले (पृ. ९७) दरग्याला प्रार्थना, पानाचा विडा आणि पांच पैसे यांची यमुनेला भेट... या सर्व गोष्टी शेजवलकर सांगतात—आणि बोलाफुलाला गांठ पडली म्हणून आपल्या अफगाण शिवाजीचें कौतुक करतात. पण स्वजनांची, खऱ्या शिवाजीच्या अनुयायांची चेष्टा करण्याची एक संधिदेखील ते दवडीत नाहींत. "कुरुक्षेत्राच्या यात्रेच्या संकल्पानुरूप खरोखरीचें कुरुक्षेत्र मराठ्यांना पानिपतास प्राप्त झालें" (पृ. १००) असें म्हणून शेजवलकर कृतज्ञता व्यक्त करीत आहेत कीं पूर्वजांची कुचेष्टा? पानिपतावर प्राण खर्चीं घालणारांनीं आम्हां मराठ्यांना जो अपूर्व वारसा ठेवला आहे (याची जाणीव शेजवलकरांना आहेच. पृ. २१७). त्याबद्दल त्यांचें ऋण मान्य करण्याची ही तऱ्हा मात्र और म्हटली पाहिजे. असो.

एवंगुण विशिष्ट अफगाण शिवाजीच्या वाटेस जाण्याचा मूर्खपणा 'नांगऱ्या' मराठ्यांनीं केला, हा शेजवलकरांचा आणखी एक आरोप आहे. त्यांनीं म्हणे अटकेपार जाण्याचा अविचार केला तो केलाच; आणि त्या थोर अफगाण शिवाजीला अकारण












डिवचला ! ( पृ. ५९ ) एवढेंच नव्हे, तर त्याला डिवचून "संकटग्रस्त राजकारण" नांगऱ्या मराठ्यांनीं आपल्या हातांत घेतलें ! ( पृ. १३८ ) शिवाजीचे मराठे मोगली पद्धतीनें मोहिमा चालवूं लागले होते आणि हा अफगाण शिवाजी, आमच्या छत्रपतींचें अनुकरण करून स्वाऱ्या चालवीत होता ( पृ. ६६ ). कशासाठी ? सैनिक व अनुयायी कुरकुरत असतां, केवळ आपल्या धर्मबांधवांसाठीं, आपल्या देशबांधवांसाठीं अभिमानानें, मराठ्यांचा मोड करण्याची जबाबदारी अंगिकारली होती. (पृ.७४) ही त्याची तारीफ मान्य करूनहि म्हटलें पाहिजे. मथुरा-वृंदावनांतले त्याचे अत्याचार ( स. १७५७ ) कुठल्याहि राज-पुरुषाला शोभणारे नाहींत. दिल्लींतल्या बादशाही झनानखान्याशीं त्याचें वर्तन माणुसकीला साजेसें नाहीं. साल दरसाल शेजारच्या देशावर लूट करावी, अत्याचार चालू ठेवावे, हा पाशवी शक्तीचा अनिर्बंध विलास असल्यामुळें तो समर्थनीय ठरत नाहीं. आणि म्हणूनच राजपुरुषांच्या मुख्य मुख्य गुणांत देखील आमच्या छत्रपति शिवाजी महाराजांशीं दुराणी अबदालीची तुलना होत नाहीं -- ती करूं पहाणें हें अत्यंत अप्रस्तुत होय.

प्रतिपक्षाची अवास्तव स्तुति किंवा त्यांत नसलेल्या गुणांचा गौरव हा स्वजन निंदेचा एक भाग समजतात. शेजवलकरांनीं असें करावें याबद्दल आश्चर्य वाटतें. नादिरशहाची त्यांनीं केलेली प्रशंसा पहा : त्यानें "रशिया, तुर्कस्तान, फ्रान्स व इंग्लंड येथील शस्त्रांची आणि युद्धपद्धतीची ओळख करून घेतली होती." ( पृ. १४५ ) ह्या ओळखीला साधनें कोणतीं होतीं. आणि शस्त्रांचा व्यापार गेल्या शतकांत गाजला तसा नादिरच्या वेळीं चालू तरी होता काय, याबद्दल विचार करतां ह्या प्रशंसेतील अतिरंजन लक्षांत येतें, तरी आपण गृहीत धरूं— नादिरचें बहुदेशी लष्करी "ग्यान" अबदालीनें उचललें !

पण "अफगाणाप्रमाणें रोज बंदूक मारून पहाणारे" मराठे नव्हते; ( अफगाणांनीं मानला तसा ) शस्त्र हा "खेळ" मराठ्यांनीं मानला नाहीं, ते नांगऱ्ये होते...... इत्यादि विवेचन (पृ. १४६) विवाद्य आहे, बंदुकीला अर्धांगीपेक्षां अधिक मान देणारे; गंमतीखातर रोज 'गोळ्या' उडवीत राहणारे; किंवा उत्तम शस्त्रें मिळविण्याबद्दल जागरूक असणारे वीर हे **अफगाण नसून यागिस्तानि पठाणी टोळ्यांपैकीं** आहेत. त्यांचा हा स्वभावविशेष ब्रिटिश अमदानीपासून—ब्रिटिशांच्या अफगाण—धोरणामुळें—प्रकट झाला. त्यांचीं लष्करी अधिकाऱ्यांनीं केलेलीं अतिरंजित वर्णनें वाचून शेजवलकरांचें हें मत बनलें असावें. पण हिंदी -- ( हल्लीं पाकिस्तानी ) सरहद्दी पल्याड यागिस्तान आहे— त्या यागिस्ताना पल्याड ड्यूरांड सरहद्द आहे-- आणि मग अफगाणिस्तानाला सुरुवात होते, हें एखादा खास नकाशा पाहिल्याखेरीज लक्षांत येणार नाहीं. यागिस्तानांतील ओसाड व रूक्ष प्रदेशामुळें तेथील पठाणी टोळ्या शेरी विन्मुख वाटल्या; बंदुकीवर त्यांची निस्सीम भक्ति दिसली, तरी पाटाचें किंवा 'चक्क्या'चें पाणी मिळतें, तेथें पठाणसुद्धां तरबेज शेतकरी बनतात. किंबहुना शस्त्रधारी पठाणांना गुंतवून ठेवण्यासाठीं, बंदुकांवरून त्यांचें प्रेम उडावें म्हणून पाटबंधारे योजना त्या प्रदेशांत सुरू केल्या आहेत. यागिस्तानी पठाणांत अफ्रीदी, मोहंमद, वजिरी शिनवारी इत्यादि टोळ्या आहेत. अफगाण टोळ्यांशीं त्यांची गल्लत झाल्यामुळें तर शेजवलकरांचा असा ( अप ) समज झाला नाहींना ?

अफगाणांना शेती ठाऊक नसती, रोज बंदुकीशीं खेळणें हेंच त्यांचें जीवन असतें तर हजार दीड हजार वर्षांचे 'कारेझ' ( जमिनींतले, खोल वहाणारे कालवे ) तेथें अद्याप चालू रहाण्याचें कारण नव्हतें. आज मितीसहि आपणांकडे येणारा अफगाणि-








स्तांनातील ताजा मेवा ( = फळफळावळ) आणि सुका मेवा, यांची साल दरसाल पैदास, केवळ रोज बंदुक उडवीत राहिल्यानें, ती खेळ म्हणून वापरल्यानें होत असते कीं काय ? अफगाणिस्तानांतहि जमिनींतलें पीक काढावें लागतें आणि तें बंदुका उडवून काढण्याची किंवा बंदुका उडवून पोट भरण्याची कांहीं नवी " युगत " त्या अफगाण शिवाजीनें आपल्या अनुयायांना शिकवून ठेविली नाहीं. शेकडो वर्षांचे द्राक्षांचे मळे, ( फार्सीमध्यें द्रख्त = झाड ); चार चार महिने बर्फाखालीं गाडून रहाणारें गव्हाचें पीक; टाळी ( च्या आवाजा ) नें फाटणारीं नाजुक पण मिष्टास खरबुजें, गुळाऐवजीं सर्रास वापरांत असलेलें " शहतूत "...इत्यादिकांची लागवड, निगा, किंवा पैदास...नुसत्या बंदुकधाऱ्यांना मुळींच साधणार नाहीं. जातीचे, हाडाचे, पिढ्यान् पिढ्याचे शेतकरी–मळेकरीच त्या कामाला पाहिजेत–आणि तसे अस्सल शेतकरी अफगाणिस्तानांतहि होते --आहेत – याबद्दल शंकाच नको. अस्तु.

स्वजनांचा थोडाबहुत तेजोभंग केल्याशिवाय शेजवलकरांचें कुठलेंच विवेचन पूर्ण होत नाहीं. ह्या तेजोभंगांत असा कांहीं ' डंख ' असतो कीं त्यामुळें शेजवलकरांचें लेखन पुष्कळजण वाचीतच नाहींत. आपलें प्रतिपादन लोकांनीं वाचावें अशी शेजवलकरांची अपेक्षा असल्यास त्यांनीं आपली लेखन-रीत थोडीशी बदलावी. " दुबळे झालेले मुसलमान सत्ताधीश सुद्धां राजकारणी बोलाचालींत मराठ्यांहून शहाणे होते " ( पृ. १२५ ). एवढें शेलापागोटें दिल्यावर दुसरा अहेर पहा — " मराठ्यांना माणसांची पारख नव्हती हेंच त्यांच्या अपयशाचें आद्य कारण इतिहासांत आढळतें. " ( पृ. १५२ ) ह्याच प्रकारचे विचार आधींहि प्रकट झाले आहेत : " मोगल दुबळे झाले होते तरी कारस्थानांत पेशव्यांस पुरून उरण्या इतके धूर्त होते" ( पृ. ५ ). आणि हे पेशवे किती धूर्त -- किंवा किती शहाणे ? तर " पश्चिम आशियाचें राजकारण पुण्यांत बसून खेळविणारे " ( पृ. १५ ). " पण मराठ्यांना राजकारणी नीतिमत्तेचा गंधहि नव्हता " असें सिद्ध झालें आहे ( पृ. २५ ). तरीहि ब्रिटिश ' राजवटी ' पेक्षां अधिक काळ मराठ्यांची सत्ता गाजली !

अबदालीची पोटभर स्तुति करणारा जोडीदार शेजवलकरांना लाभला आहे आणि तो म्हणजे सर जदुनाथ सरकार ! आशियांतील नेपोलियनचा उजवा हात; जन्मजात सेनानी; आशियांतील अत्युत्कृष्ट फिरता तोफखाना बाळगणारा; त्याच्या घोडदळांची बरोबरी तमाम आशियाखंडांत कुणाला करतां आली नाहीं ... इत्यादि विशेषणें अबदालीला जदुनाथांनीं बहाल केलीं आहेत. अशा शत्रूशीं सामना देणारा त्याला कांहीं काळ कां होईना थोपविणारा-- हटविणारा-- जदुनाथ सरकारांच्या मतानें थोडा तरी वरच्या दर्जाचा सेनानी असायला हरकत नव्हती. पण ते भाऊला " जुगारी " हें विशेषण बहाल करतात– जनकोजी " बचा " म्हणून त्यांना विचारांत घ्यावासा वाटत नाहीं–तर मल्हारराव थेरडा म्हणून लढाईत निरुपयोगी अशा दृष्टीनें जदुनाथांचें कलुषित आहे. पानिपतावर मराठे हरले यामुळें इंग्रजांचा मार्ग सुकर झाला अशी स्पष्ट कबुली अनेक साम्राज्यवादी इंग्रजांनीं दिली आहे. पण जदुनाथ सरकारांना तो परिणाम दिसला नाहीं. फक्त राघोबाची दोषी महत्त्वाकांक्षा तेवढी दिसली– आणि त्याला मोकळीक मिळाली असें इतिहासकाराला स्पष्ट दिसून येईल– असें ते म्हणतात. " मराठ्यांनीं चार वर्षांत असें स्पष्ट पटवून दिलें कीं ज्यांच्या संरक्षणाची जबाबदारी आपण पत्करतों– त्यांचें संरक्षण आपणाला मुळींच करतां आलें नाहीं; आणि स. १७६१ मध्यें तर त्यांना स्वतःचाहि बचाव साधला नाहीं !! "

या इतिहासकाराच्या निरीक्षणाशीं ताडून पहाण्यासारखें निरीक्षण ' इस्लामी-- विश्वकोशा ' च्या



अनुक्रमणिका






ताज्या आवृत्तींत (स. १९६० प्रथमखंड) आढळतें : " पानिपतमुळें... निजामाला आपली बाजू (उद्गीरमुळें ढासळलेली) सावरतां आली; किंबहुना हैदराबाद संस्थान नष्टप्राय झालें असतें तें बचावलें. म्हैसूर मध्यें हैदर अलीला पुढें येण्यास पानपतमुळें सवड मिळाली: बंगालमधील आपलें बूड स्थिरावण्यासाठीं जरूर ती मोकळीक इंग्रजांना लाभली.... इतके दूरवर परिणाम पानिपतच्या लढाईचे झाले. (पृ. २९६) यांतील खरी ऐतिहासिक दृष्टि कोणती आणि ठुजबी कोणती हें न सांगतां समजण्यासारखें आहे. जदुनाथ सरकारांनीं किंवा शेजवलकरांनीं मराठ्यांच्या राज्यकारभारांतील इतके दोष दाखविले– तरीदेखील मराठ्यांचा राज्यशकट बरीच वर्षें चालला; हिंदुस्थानांत त्याचा दबदबा राहिला. त्या वेळच्या बहुतेकांनीं मराठ्यांशीं राजनैतिक दोस्ती केली आणि मुख्य म्हणजे ब्रिटिशांनी येथील राज्यकारभार हातीं घेतला तो बऱ्हंशीं मराठ्यांपासून ! हें अत्यंत व्यवस्थित–सर्वांच्या स्तुतीस पात्र असें राज्य, राणीनें कारभार हातीं घेतल्यानंतर पुरी शंभर वर्षेंहि टिकलें नाहीं

अशा आम्हां मराठ्यांना दोन उपकारकर्ते यदृच्छया लाभले : पहिला औरंगजेब आणि दुसरा अबदाली. आमचें स्वत्व, आमची जाज्वल्य स्वातंत्र्यप्रीति, आमचें शौर्य, आमचें धैर्य या सर्व गुणांची वाढ औरंगजेबानें नाहीं कां केली ? तो आपल्या साम्राज्याचें सारें सामर्थ्य, सारें ऐश्वर्य, सारें वैभव एकवटून दक्षिणेंत आम्हांला नामशेष करण्याच्या निश्चयानें आला नसता तर आमच्या या सुप्त शक्तींची वाढ कशी झाली असती ? त्याचा पार धुव्वा उडविण्याची, त्याला हैराण करण्याची, वैतागून नैराश्यानें "मरण बरें वाटतें" असें त्याला म्हणायला लावण्याची संधि आम्हांस एरवीं कशी मिळाली असती ? आम्हांला नष्ट करण्यासाठीं आलेल्या आमच्या कट्ट्या दुष्मनानेंच आम्हांस मोठें नांव मिळवून दिलें -- आमची कीर्ति सर्वत्र फैलावली.

दुसरा, अबदाली -- तोहि दूर देशांतून आमच्यासाठी जसा कांहीं धावून आला. त्यानें इस्लामी बंधुत्वाचा आव आणला. आम्हां मराठ्यांशीं स्नेहभावानें, आपलेपणानें वागणाऱ्यांना आपणाकडे वळवून घेतलें, कांहींना तटस्थ राहूं दिलें. "मरतील पण हटणार नाहींत" — अशा एकाकीं मराठ्यांशीं त्याला झुंज द्यायची होती.

ही त्याची हौस पानिपतच्या संग्रामामुळें पुरी झाली. आम्ही भारत-संरक्षणासाठीं, दिल्लीच्या तख्तनशीनासाठीं, वचनपूर्तीसाठीं प्राणपणानें कसे लढतों हें अबदालीनें स्वतः पाहिलें. रणांगणाची भीति कशी आम्हांस वाटत नाहीं, मिसरूड न फुटलेलीं पोरें सुद्धां तगड्या, थोराड, धिप्पाड अफगाणाशीं भिडतांना डरत नाहींत हें पाहून अबदाली थक्कच झाला. त्याचा अभिमान पार पळाला ! त्यालाच मराठ्यांचें 'पाणी' चाखतां आलें; त्यानेंच मराठी 'पाणी' काय मोलाचें आहे हें नीट जोखलें ! आणि " तुमच्याशीं आमचा वैरभाव होता कुठें ? दिल्लीचा कारभार तुम्ही पूर्ववत् चालवावा– स्नेह कायम रहावा " अशा आशयाचें पत्र अबदालीनें लिहिलें– तेव्हां त्याची लढाईची खुमखुमी पार जिरली होती– मराठ्यांशीं पुनः लढण्याची हिंमत त्याला उरली नव्हती, असें दिसतें.

हा अबदाली "बाबा" (= अफगाणिस्तानांत त्याला याच नांवानें आम जनता ओळखते) म्हणजे नादिरच्या तालमींत तयार झालेला, लुटालूट, कत्तली, स्वाऱ्या, हल्ले करण्यांत तरबेज, नादिरसे सवाई असा होता. त्याला व्यापारी दृष्टि होती म्हणून त्यानें कंदाहारांत कांहीं शिकारपुरी व्यापाऱ्यांना मुद्दाम बोलावून नेलें– ते आजहि तेथील व्यापारधंद्यांत आपलें आसन टिकवून आहेत. या "बाबा" ची कबर कंदाहारजवळ आहे. त्याची अफगाण दृष्टीनें

योग्यता व्यक्त करणारा लेख त्याच्या थडग्यावर कोरला आहे –

> " अहमदशहा दुराणी मोठा राजा होता; त्याच्या राज्यांत सिंह आणि हरिणी एकत्र सुखानें नांदत. त्याच्या मोहिमांच्या अखंड आवाजामुळें शत्रूंचे कान बधिर होत. "

या वरून त्याच्या कडक शिस्तीची वारंवार परदेशांत लुटीसाठीं जाण्याची संवय स्पष्ट होते. अफगाणांचा स्वभाव विशेष–लूटमार करूं देणारावर खूष असावयाचें हा ओळखून अहमदशहानें मोहिमा काढल्या – हिंदुस्थानवर एका मागून एक अशा ९ स्वाऱ्या केल्या. त्या बहुधा हिवाळयांत असत. ज्या वर्षी तो हिंदुस्थानवर घसरला नाहीं–त्यावर्षी देशांतच उत्तरेकडे–वायव्येकडे–थोडी गडबड माजली होती--असें दिसतें. अशा अबदालीला छत्रपतींचें थोर-पद बहाल करण्यांत रास्त पारख होत नाहीं. आमच्यासाठीं नव्यानें श्रीशिवचरित्र लिहिणाऱ्या शेजवलकरांना छत्रपतींची योग्यता ठाऊक नाहीं असें कसें म्हणावें ?

## अबदाली – गिलचे – दुराणी

**पानिपतावर** – आमच्याशीं लढणारा अहमदशहा हा अबदाली ( अब्दाली ) गिलचा ( गिल्चे ) दुराणी ... अशा तीन नांवांनीं ओळखतात. अबदाली ही अफगाणिस्तानांतली एक टोळी; तिचा नायक अहमदशहा ( खान ) अफगाणांचा राजा झाला (निवडला ) तेव्हां एका वलीनें त्याला आशीर्वाद दिला आणि दूर-इ-दौरान ( = चालू जमान्यांतला ' मोती ' ) असा किताब त्याला बहाल केला. पण अहमदखानहि कमी हुषार नव्हता. त्यानें वलीला विनंती केली आणि "दूर–इ–दुर्रान" ( = मोतीदाण्यांतला मोतीदाणा ) असा किताबांत बदल सुचविला. वलीनें तो मानल्यावर अबदालीनें आपल्या जमातीला ' दुराणी ' असेंहि नांव दिलें. ह्या मानाची खूण म्हणून अहमदखानानें आपल्या उजव्या कानांत "कर्णफुला" सारखा एक टपोरा मोती घालण्यास ( तो भूषण म्हणून वापरण्यास ) सुरवात केली असें कित्येक ठिकाणीं म्हटलें आहे. अबदाली ( = दुराणी) जमातींत खालील टोळयांचा समावेश आहे : सद्दोझाई, पोपलझाई, बरकझाई, इलकोझाई, अचक, नूर, इशाक, खगवानी......

गिलचे म्हणजे गिलझाई जमात. ' खिलजी ' घराणें दिल्लीस गाजलें, त्यांचाहि संबंध त्या गिलझाईशीं जोडतात. खिल्ची ( = समशेर बहादर ) या तुर्की शब्दाकरून गिलझाईची व्युत्पत्ति संभवते; किंवा ' गलझोई ' ( चोराचा पोर ) असाहि अर्थ संभवतो. ह्या दुसऱ्या अर्थाला अनुरूप कथा अशी कीं शहा हुसेन यानें ( प्राचीन कालीं ) बिबी महोला फूस लावून नेलें – तिच्याशीं लग्न केलें – त्यांच्या मुलाला ' चोराचा पोर ' म्हणत. ह्याच पोर गिलझाई जमातीचा आद्य पुरुष. ह्या गिलझाई जमातींचा अबदालींशीं झगडा असतां तें नांव अबदालीस मिळालें हा एक चमत्कार समजावा.








श्री. ना. गो. चापेकर

# मंत्रकार

ऋक् मंत्रांच्या कर्त्यांविषयींच्या आजपर्यंतच्या कल्पना पुनः तपासून घेणें अवश्य झालें आहे. ही ऋचा मी केली आहे अशीं वाक्यें ऋग्वेदांत आढळतात. मात्र बहुतेक ठिकाणीं मी म्हणजे कोण हें सांगितलें जात नाहीं. तेव्हां ऋचांचे कर्ते जे ऋषि ह्यांचीं नांवें निखालस रीतीनें आपणांस कशीं समजणार ? वेद अत्यंत प्राचीन. ते लोकांच्या नित्य म्हणण्यांतहि नसतील. ह्यास्तव आधीं ऋचांचें संशोधन आणि नंतर त्यांच्या कर्त्यांचें संशोधन असा प्रसंग उद्भवणें अगदीं संभवनीय आहे. हा विचार खालील श्लोकांत आढळतो—

युगान्ते अन्तर्हितान् वेदान् सेतिहासान् महर्षयः ।
लेभिरे तपासा पूर्वं अनुज्ञाता स्वयंभुवा ॥

ह्या श्लोकांत लोकांच्या कल्पना ग्रथित केल्या आहेत तर त्या- गतयुगांत वेद म्हणण्यांत अगर प्रचारांत नव्हते. ते कदाचित् पोथ्यांतून असतील. सेतिहासान् हा शब्द महत्त्वाचा आहे. वेदांची माहिती-तदनुषंगिक गोष्टी- त्यांचा तपशील ह्या गोष्टी इतिहास शब्दावरून सूचित होतात. हे युगान्तरीं अदृश्य झालेले वेद परमेश्वरकृपेने महर्षींनीं प्राप्त करून घेतले. पोथ्यांतून वेदांना बाहेर काढलें. मंत्र लेखनिविष्ट असावे. वेदांचा इतिहास असेल तर कर्ते लेखनिविष्ट असले पाहिजेत. दुर्दैवाने असे लेख उपलब्ध नाहींत व नव्हते. आज ऋषि निश्चित केले आहेत ते सर्वानुक्रमणिकेवरून. ह्या ग्रंथाखेरीज दुसरा आधार नाहीं. सर्वानुक्रमकार कात्यायन कोणत्याहि ग्रंथाचा आधार देत नाहीं. " अनुक्रमिष्यामः यथोपदेशम् " असें तो म्हणतो. ह्यावरून ही मुखपरंपरा होती हें उघड आहे. अडीच हजार वर्षांपूर्वी कात्यायनानें पढविलेलें प्रथम लिहून काढलें असें म्हणावें लागतें. ज्या वेदांचें दर्शन कांहीं लोकांना झालें म्हणजे त्यांनी पोथ्या शोधून काढल्या त्यांत ऋषि लिहून ठेवलेले असते तर यथोपदेशं म्हणण्याचें प्रयोजन नव्हतें. निरनिराळ्या वैदिकांकडून निरनिराळे ऋषि विद्यार्थ्यांनीं मुखोद्गत करणें असंभवनीय नाहीं. कात्यायनावांचून दुसऱ्या कोणी आपले पाठ लिहून ठेवले नाहींत हें दुर्दैव होय. आणखी एक शंका अशी येते कीं, प्रत्यक्ष सूक्तांत कर्त्याचा उल्लेख नसला तर त्या सूक्ताचा कर्ता सांपडावा तरी कसा ? पांचवें मंडल घेऊं. ह्या मंडलांत चाळिसावर सूक्तांत कर्त्याचें नांव नाहीं.

ह्या खेरीज दुसऱ्या अनेक अडचणी आहेत. उदा. सूक्त २५ वें. ह्याचे कर्ते वसूयु नांवाचे आहेत. अनेकांनी हें सूक्त कसें रचलें ? ह्या वसूयुंचीं नांवें निराळीं नको का ? वसूयु हें आडनांव कीं व्यक्तीचें नांव. 'आत्रियाः वसूयुनामानः ऋषयः' असें सायनभाष्य आहे. ह्यावरून वसूयु नांवाचे अनेक होते असें दिसतें. ह्यावरून एकाच नांवाचे भाऊ अथवा भाऊबंद होते असें समजावयाचें काय ? 'वसूयवः' हें नांव सूक्तांत नाहीं. शेवटच्या मंत्रांत वसूयवः शब्द आहे हें खरें, पण त्याचा अर्थ सायनाचार्य वसु( द्रव्य )कामाः असा करितात. तथापि सर्वानुक्रमणीच्या आधारावर चित्रावशास्त्री तें विशेष नाम समजतात.

५।५२ हें सूक्त श्यावाश्व ऋषीच्या नांवावर आहे. ह्यांत श्यावाश्वाचें नांव आरंभींच आलें आहे. तें संबोधन आहे. पहिल्या अर्ध्या ऋचेचा भावार्थ ' हे श्यावाश्व मरुतांची तूं स्तुति कर ' असा आहे. अर्थात् श्यावाश्वयाला स्तोत्र गाण्यास सांगणारा मनुष्य निराळा आहे. तेव्हां ह्या सूक्ताचा कर्ता श्यावाश्व कीं त्याला सांगणारा असा प्रश्न उद्भवणें स्वाभाविक आहे. श्यावाश्व, सूक्तकर्ता मानल्यास श्यावाश्व आपणासच आपलें नांव घेऊन स्तुति करण्याचा आदेश देत आहे असें समजावें लागतें. हा द्राविडी प्रणाम करण्याचें कारण काय ? ह्या सूक्तांत श्यावाश्व्याचें नांव हें एकदांच आलेलें आहे.

श्यावाश्व शब्दाचीं पदें संहितेंत श्याव आणि अश्व अशीं तोडलेलीं आहेत. श्याव शब्दाचा अर्थ श्यामवर्ण असा सायनांनी केला आहे ( १-१००-१६ ).

श्यामवर्णी घोडे आहेत ज्याचे, तो श्यावाश्व. नांवाच्या शब्दाचीं पदें पाडण्याचा हेतु काय? सायनाचार्य नांवाचा अर्थ करीत आहेत काय? श्यावाश्व हा प्रवर-ऋषि होता तोच हा आहे असें मानण्यांत आलें असावें. मरुतांचे घोडे श्यामवर्णी असल्याची कल्पना आहेच.

एका पांचव्या मंडलांत दोन सूक्तांचे ऋषि निश्चयाने सांगतां येत नाहींत. उ. सूक्तें २ व २७. दुसऱ्या सूक्ताचे कर्ते कुमार अत्रिपुत्र, जनपुत्रवृश ह्यांपैकीं, कोणीतरी किंवा दोघेहि. सत्ताविसाव्या सूक्ताचें कर्तृत्व त्र्यरुण त्रैवृष्ण, त्रसदस्यु पौरकुत्स्य, अश्वमेध भारत व अत्रि भौम ह्यापैकीं कोणातरी एकाकडे. ह्यावरून काय निष्पन्न होतें तें पहा. मला वाटतें निरनिराळ्या लोकांच्या पाठांत हे निरनिराळे ऋषि असावे. 'अत्रि-भौमः इति केचित्' असें प्रत्यक्ष सर्वानुक्रमणीच म्हणते.

मंत्रकर्ते व मंत्रद्रष्टे हे एकार्थी शब्द आहेत अशी सर्वसाधारण समजूत आहे. ऋषींना वेदांचें दर्शन झालें ही अशास्त्रीय व अनैतिहासिक कल्पना. कारण वेद अपौरुषेय आहेत. परमेश्वराचे श्वास आहेत. माझ्या मतें ही कल्पना अंधश्रद्धेच्या व भावनेच्या उत्कटत्वांतून प्रसवली आहे. सुतार रथ करतो त्याप्रमाणें हें स्तोत्र मी तासून घासून उत्कृष्ट बनवलें आहे असे उद्गार प्रत्यक्ष वेदांत अनेक वेळां ऋषींच्या मुखांतून निघाले असून वेद अपौरुषेय आहेत हें म्हणणें डोळसपणाचें नाहीं.

प्रारंभींच दिलेल्या श्लोकांत युगान्तीं वेद अन्तर्हित झाले होते व ते ऋषींनी प्रकट केल्याचें वर्णन आहे. यज्ञक्रिया व वेद ह्यांचा समवाय संबंध आहे. यज्ञक्रिया थांबली कीं वेदहि विराम पावतात. ह्यालाच उपर्युक्त श्लोकांत अन्तर्हित म्हटलें आहे. हें अन्तर्हित–मनांतल्या मनांत किंवा पोथ्यांत ठेवलेले वेदमंत्र कांहीं जिज्ञासूंनी प्रकाशांत आणले. ह्यांना वेदांचें दर्शन घडलें असें म्हटलें आहे. हे द्रष्टे होत. ह्यावरून कर्ते व द्रष्टे एक नव्हत हें स्पष्ट आहे. कात्यायनानें कर्ते सांगितले कीं द्रष्टे सांगितले? ज्या ऋषींना उजेडांत नसलेले वेद दिसले तेच सर्वानुक्रमांत दिलेले ऋषी नसतील कशावरून?

वेद अन्तर्हित होण्याचें कारण काय? भारतांतच जर वेदांचा अवतार झाला; भारत हीच जर प्रथमपासून यज्ञभूमि होती तर वेद अदृश्य होण्याचें कारण काय ह्याचा विचार व्हावयास पाहिजे. हें कारण जोंपर्यंत कोणी सुचविलें नाहीं तावत्काल टिळकांचा उत्तरध्रुव सिद्धांत मान्य करणें प्राप्त आहे. ह्याला दुसरें एक पोषक प्रमाण देतां येईल. नुसता ग्रंथ तोंडपाठ करणाराला परीक्षेत एकहि गुण कोणी देणार नाहीं. ज्याला त्या ग्रंथाचा अर्थ समजेल तोच श्रेष्ठ व विद्वान् समजला जातो. असे असून आज आपण काय करितों? वेद-भाष्य सांगणाऱ्या शास्त्र्याला फार तर त्याच्या पोथी पुढें लहानसें पांढरें नाणें ठेवून त्याला संतुष्ट करतों. उलट वैदिकांना – वेदार्थशून्य जनांना – मोठी दक्षणा देतों. इतकेंच नव्हे तर त्यांच्यापुढें साष्टांग नमस्कार घालतों आणि त्यांचा आशीर्वाद मागतों. वैदिकां-विषयींचा पूज्यभाव शास्त्र्यांविषयीं नसतो. इतक्यावरच हें प्रकरण थांबत नाहीं. संसाररूपी सागराच्या पैलतीरीं नेणारा असें म्हणून वैदिकाची प्रार्थना करतों आणि त्यांच्या पायाच्या धुळीने मो पुनीत होईन अशी आशा करतों. वेदपठण करणाऱ्या ब्राह्मणांत सर्व देवता वास करतात म्हणून वैदिकांची निंदा कोणी करूं नये, त्याच्या पुढे मस्तक नमवावें ह्या शब्दांत वैदिकांचें स्तवन केलें जातें. आणि हें सर्व यास्काने वैदिकांना भारवाहक म्हणूनसुद्धां! ह्या घटनेचा खुलासा टिळकांचा 'उत्तर ध्रुवावर आर्यांची वसती होती' हा सिद्धांत मान्य केल्याशिवाय होत नाहीं. प्रलयकालीं पांगापांग झाली; यज्ञ-क्रिया थांबली; ती पुनः ह्या बाजूला स्थिरस्थावर झाल्या नंतर सुरू करण्यांत आली; असें मानल्याखेरीज 'युगान्ते अन्तर्हितान् वेदान्' ह्या शब्दाचा समर्पक अर्थ लावतां येत नाहीं.

पांचवें मंडल अत्रि (अत्रि=अत्रिभौम)[१] व त्याचे वंशज (अर्थात् बाहुल्यात्) ह्यांचें समजतात. ह्यांत कितपत सत्य आहे तें आतां बघूं. अत्रीच्या स्वतःच्या नांवावर कांहीं सूक्तें आहेत. ह्याचा अर्थ अत्रि मूळ पुरुष जिवंत असून त्याने रचलेलीं सूक्तें आहेत. आतां अत्रीचे समजले जाणारे वंशज सुमारें ३६ आहेत. त्यांस आत्रेय ह्या नांवाने संबोधिलें आहे. आतां हे ३६ ऋषि अत्रीचे पुत्र किंवा नातू अथवा पणतू होते काय? कोणतें अनुमान निघतें? अत्रीला भाऊ होते

१– तर्पणांत अत्रिस्तृप्यतु असें आहे; अत्रिभौमस्तृप्यतु असें नाहीं.

कीं नाहीं ? अत्रीला आईबापच नव्हते तर भाऊ कोठून येणार ? अत्रि हा मानसपुत्र आहे. ही कल्पिलेली व्यक्ति आहे हें उघड आहे. माझ्या मतें अत्रि हें कांहीं लोकांचें देवक ( टोटेम ) असावें. ह्या देवाला भजणारे ते सर्व अत्रि. हें खरें असेल तर वंशाची कल्पनाच सोडून दिली पाहिजे; ह्या कात्यायनाने ठरविलेल्या सूक्तऋषीं-विषयीं कोणी शंका घेऊं नये म्हणून एक विधि निर्माण करण्यांत आला —

अविदित्वा ऋषिं छंदो दैवतं योगमेव च ।
यो ऽध्यापयेत् जपेत् वापि पापीयान् जायते तु सः ॥

—हा आदेश इतर वेदानुयायी पाळीत नाहींत. ऋग्वेदापुरताच हा नियम आहे. वैश्वदेवाच्या वेळीं अग्न्यावाहन करतांना ‘चत्वारिशृंगा गौतमो वाम-देवोऽग्निस्त्रिष्टुप्, अग्न्यावाहने विनियोगः’ हें ऋग्वेद्या-प्रमाणें हिरण्यकेशी म्हणत नाहींत. ते एकदम ‘चत्वारि शृंगा त्रयोऽस्य पादा...... येथपासून सुरवात करतात. छंद हे समजण्यासारखे आहेत. देवताहि सूक्तावरून ठरवितां येईल. ऋषींबद्दल निश्चयपूर्वक सांगतां येण्या-सारखें नाहीं. ह्यास्तव वरील नियमाला अनुसरणें आवश्यक नाहीं. ‘ऋषिर्दर्शनात्’ ह्या वचनावरून मंत्र-द्रष्टेच आम्हांला अभिप्रेत आहेत, मंत्रकर्ते नाहींत असें दिसतें. ‘पञ्चमे मंडले अनुक्तं गोत्रं आत्रेयं विद्यात्’ हा नियम किती धरसोडीचा आहे हें सांगावयास नको. पुढील काळांतील गोत्रप्रक्रिया वेदकालीन ऋषींना लावणें आणि तदनुरोधाने अर्थ करणें हें साफ चुकीचें आहे. अत्रि ही व्यक्ति तरी होती की नाहीं ह्याचा निश्चय न करितां अत्रीचें कुल ठरविणें हें बरोबर कसें ठरेल ? आधी अत्रीचे आई बाप सांगा मग त्याच्या पुत्रपौत्रांचा विचार. अत्रि हें सूर्याचें नांव असावें असें मी आपल्या अत्रीवरील लेखांत सुचविलें आहे. अत्रि नांवाचें सूर्य-रूप ज्यांचें पूज्यस्थान होतें ते अत्रि असें म्हणतां येईल कीं नाहीं ह्याचा विचार अद्यापि कोणी केलेला नाहीं. वेदमंत्रांच्या भाषांतराचीं मूलभूत तत्त्वें अद्यापि ठराव-याचीं आहेत.

कात्यायन अत्रीच्या वंशजाला आत्रेय म्हणतो. परंतु आत्रेय शब्द उभ्या ऋग्वेदांत नाहीं. अत्रीशीं संबद्ध असलेले आपणांस अत्रयः म्हणतात. अत्रयः ह्याचा अर्थ अत्रिपुत्राः असा सायणाचार्य करतात तो कोणत्या आधारावर ? अत्रि गोत्राच्या प्रवरांत आत्रेय हें एका ऋषीचें नांव आहे. अर्चनानस् व श्यावाश्व हे सुद्धा अत्रि कुलांतील म्हणता तर ते आत्रेय नाहींत काय ? प्रवरऋषी हे गोत्र ऋषीचे पूर्वज असें एक मत आहे. आतां आत्रेय हा ह्या मतानुसार अत्रिऋषीचा बाप होतो.

ह्यावरून ही कल्पना किती हास्यास्पद आहे हें दिसून येईल. प्रवर फक्त श्रौतांत येतात. तेथे उच्चारित ऋषीच्या सांप्रदायाप्रमाणें मी हें कर्म करीत आहे असा अर्थ होतो. हें वैकल्पिक मत ग्राह्य मानल्यास अत्रि कुळांतील ह्या तीन ऋषींचे वेगवेगळे संप्रदाय होते असें म्हणावें लागेल; असें झाल्यास कुलपरंपरेला कांहीं अर्थच राहिला नाहीं. तात्पर्य गोत्र, प्रवर, ऋग्वेद ऋषि ह्यांची आपणांस कांहीं माहिती लागली नाहीं असेंच समजलें पाहिजे. चुकीचे मंत्रकार दिल्यास संशोधन दूषित होतें. उदा. एका सूक्ताचा ऋषि वसिष्ठ दिला आहे. सूक्तांत वसिष्ठाचें नांवहि नाहीं. असें असून त्या सूक्तांतील विशेष गोष्टी वर्णिलेल्या असतील त्यांचा संबंध आपण वसिष्ठाला चिकटवितों आणि त्या सूक्ताचा कर्ता जर खरोखरी वसिष्ठ नसेल तर वसिष्ठाचें असत्यचित्र आपण निर्माण करतों. श्यावाश्व हा ९।३२ चा ऋषि म्हणून सर्वानुक्रमांत दिला आहे. सूक्तांत श्यावाश्वाचें नांवहि नाहीं. उलट “आत् ईम त्रितस्य योषणः अद्रिभिः हरिं हिन्वन्ति” असे शब्द आहेत. ह्यांचा अर्थ त्रिताचीं बोटें सोमाला दगडांनीं कुटतात असा आहे. मग मंत्रकार त्रित कां नसेल ? अशाच आधारावर ८।३६ चा कर्ता श्यावाश्व ठरविलेला दिसतो. अत्रीची स्तुति ‘हे इन्द्र, तू श्रवण केलीस तशीच सोम पिळणाऱ्या श्यावाश्वाची स्तुति ऐक (ऋचा ७)’ अशा संदर्भात श्यावाश्वाचें नांव आलेलें आहे. ह्या ऋचेंतला अत्रि कोण असावा ? ६ व्या ऋचेंत अत्रीणां-बहुवचनी शब्द आहे. हे इन्द्रा तूं अत्रींचें स्तोम श्रेष्ठ कर असें पहिल्या अर्ध्या ऋचेचें भाषांतर चित्रावशास्त्री करतात. येथें अत्रींचें स्तोत्र म्हणजे कोणाचें हा प्रश्न उद्भवतो. मात्र श्यावाश्व हा अत्रींपैकीं असावा हें ह्यावरून दिसतें. अर्थात् ह्या सूक्तांतील सर्व ऋचा एक मुखी आहेत असें गृहीत धरून.

ऋग्वेदाचा अर्थ लावणें अत्यंत दुर्घट कर्म आहे; नव्हे अशक्यप्राय आहे. ऋग्वेदाचा अर्थ ऋग्वेदा-वरूनच समजून घेणें हा सर्वांत प्रशस्त मार्ग कांहीं












मानतात. मी तोच मार्ग स्वीकारला आहे. तथापि ह्याहि मार्गाचें समर्थन करणें अवघड आहे. ग्रंथावरुन ग्रंथाचा अर्थ लावणें केव्हां बरोबर असतें, जेव्हां तो ग्रंथ एक मुखी अगर एक हातीं असेल तेव्हां. ऋग्वेद ग्रंथांतील हजारों ऋचा शेंकडों ऋषींनी रचलेल्या. शिवाय रचनाकालांतहि शेंकडों हजारों वर्षांचें अंतर. रचनाकालप्रमाणें रचनास्थलेंहि भिन्न. अशा ग्रंथाचा अर्थ समाधानकारक रीतीनें लावणें कोणाच्याहि आटोक्याच्या बाहेर आहे. तशांत आमची विद्वत्ताहि वरवरची असते. आमच्या विद्यापीठांतील विद्वान् संस्कृत वाङ्मयांत प्रावीण्य संपादन केलेल्यांना ऋग्वेद समजलाच पाहिजे असें समजतात. वैदिक शिक्षण स्वतंत्र माणसाकडे सोपविल्या खेरीज वेदाभ्यासाची घसरलेली गाडी योग्य मार्गावर येणें कठीण दिसतें.

वैदिक आर्यांची वसती उत्तरध्रुवावर होती हा टिळकांचा शोध इकडे अगर तिकडे कोणासहि मान्य नाहीं. मला तर त्यांत टिळकांच्या प्रतिभेची चमक दिसते. परंतु पुढें मागें टिळकांचें म्हणणें मान्य झाल्यास ऋग्वेदाच्या अर्थांत किती तरी फेरबदल करावा लागेल. आणि त्यादृष्टीने संशोधन करावयाचें म्हणजे अन्तर्हित वेद शोधून निराळे काढावे लागतील. ह्या कालांतील काव्याचें सार काळोखी काळ संपवण्याचें औत्सुक्य दाखवील. अर्थात् इन्द्र व अंधार रूपी राक्षस अथवा दस्यु ह्यांच्यांतील युद्ध आणि उषा, अश्विनी ह्यांची स्तुति ह्याचें वर्णन प्राधान्याने असणार. त्याच अनुरोधाने पहिल्या देवता कोणत्या, त्यांत पाठीमागून अन्य देवतांची भर कशी पडत गेली हें पाहणें इष्ट होईल. प्रथमतः प्रत्येक देवता नांवाने ओळखली जाई. सर्व देवांना एका नांवांत ओळखण्याची कल्पना नंतरची हें अनुमान बरोबर असल्यास आदित्य शब्द असलेल्या ऋचा पुढील काळांतील असें म्हणतां येईल काय ह्याचा विचार संशोधनाला उपयुक्त ठरेल. ऋग्वेदांत आलेल्या पशुपक्षांचीं नांवें पाहून हे प्राणी कोणत्या हवेंत राहाणें संभवनीय आहे, उत्तरध्रुवावर मनुष्यांबरोबर कोणते प्राणी होते ह्याचाहि शोध करावा लागेल. सूर्याच्या रथाला कवींनी घोडे लावले आहेत, बैल लावले नाहींत ह्याचें कारणहि समजून घ्यावें लागेल. ऋग्वेदाचा अर्थ लावणारा पहिला मनुष्य पदकार होय. ह्या पदांचेंहि स्वतंत्रपणें संशोधन करितां येण्यासारखें आहे. वेदग्रंथ सांप्रत छापण्यांत येतात त्यांत संहितांच्या पोथ्यांतील पाठभेद देण्याची वहिवाट आहे. परंतु तीच ऋचा अन्य वेदांत पाठभेदानें आढळल्यास त्या पाठभेदांचा अन्तर्भाव ऋग्वेद संहितेच्या पाठभेदांत करण्यास हरकत कां असावी ?

अत्री आपल्या अग्नीला अंगिरा ह्या नांवाने संबोधितात. अंगिरा अग्नि अंगिरसांचा आहे. अत्री व अंगिरस ह्याचा संबंध कसा होता इत्यादि पुष्कळ सूक्ष्म गोष्टींचा विचार होण्याची आवश्यकता आहे. वेदाभ्यासाकरितां स्वतंत्र प्राध्यापकाची योजना झाल्याविना ऋग्वेदाचा अर्थ मनसोक्त रीतीने केला जाईल.

---









प्रा. आर्. बी. जोशी

# विश्वभाषा एस्पेरँटो

जागतिक ऐक्यासाठीं झटणाऱ्यांना विश्वभाषेचा प्रश्न गेलीं कित्येक वर्षे सतावीत आहे, तत्त्वज्ञ तर कित्येक शतकापासून विश्वभाषेचें स्वप्न पाहात आले आहेत. त्या स्वप्नाचें फलद्रूप म्हणून कांहीं विश्वभाषांच्या योजनाहि जन्मास आल्या. पण त्या सर्व योजना फक्त योजनाच राहिल्या व त्यापैकीं फक्त एकच योजना एक संपूर्ण तर्कशुद्ध भाषेच्या स्वरूपांत उतरून जीवनाच्या विविध विभागांत प्रत्यक्ष उपयोगाच्या परिक्षेंत यशस्वी होऊं शकली आणि विश्वभाषा बनण्याची आपली योग्यता दाखवून दिली. हीच ती विश्वभाषा की जी एस्पेरँटो या नांवानें आज सर्व जगभर प्रसिद्ध आहे. हिचा विश्वभाषा बनण्याच्या आपल्या योग्यतेसंबंधीचा दावा आज जगांत मान्य झालेला आहे व विश्वभाषा बनण्याचा मान आज हिला प्राप्त झाला आहे.

एस्पेरँटोचा एक विश्वभाषा म्हणून जेव्हां खूप प्रसार होऊं लागला तेव्हां एस्पेरँटोच्या आंदोलनांतूनच आणखीन दोन विश्वभाषांचा जन्म झाला– एक ईडो व दुसरी नोव्हलिस्. त्यांचे जनकहि प्रथम एस्पेरँटिस्टच होते. पण नंतर एस्पेरँटोमध्यें कांहीं सुधारणा होणें जरूर आहे असें त्यांना वाटून एस्पेरँटोमध्यें कांहीं सुधारणा करून ज्या विश्वभाषा त्यानी बनविल्या त्याच ईडो व नोव्हलिस् या विश्वभाषा होत. यापैकीं ईडोनें एस्पेरँटोशी कांहीं दिवस तरी सामना केला, पण शेवटीं तिला हार खावी लागली. पण नोव्हलिस् मात्र केवळ एक योजनाच राहिली. याप्रमाणें एस्पेरँटो ही आपल्या सर्व प्रतिस्पर्ध्यांना जिंकून आज विश्वभाषा बनली आहे. आज सत्तरावर वर्षे झालीं एस्पेरँटो ही एक जिवंत व प्रत्यक्षांत जीवनाच्या विविध विभागांत जगभर उपयोगात असलेली विश्वभाषा म्हणून सातत्यानें टिकून आहे इतकेंच नव्हे तर दिवसेदिवस तिचा प्रसार वाढतच आहे. यामुळें विश्वभाषेचा प्रश्न आज सुटला आहे असेंच जवळ जवळ एस्पेरँटोनें दाखवून दिलें आहे.

एस्पेरँटोचे जनक लुड्व्हिग् लॅझाडस् झामेन् होफ् या नांवाचे एक पोलंडमधील ज्यू होते. त्यांचा व्यवसाय डॉक्टरीचा होता व ते एक आय्-स्पेशॅलिस्ट होते. प्राप्तीच्या दृष्टीनें त्यांची डॉक्टरी यशस्वी नव्हती. त्यांची डॉक्टरी अशी होती की पेशंटाची तर त्यांच्याकडे नेहमी चिकार गर्दी पण प्राप्ती मात्र नेहमी कमी ! याचें कारण गरीबाकडून ते फी घेत नसत आणि त्यांच्याकडे गरीब पेशंटांचीच जास्त गर्दी असे. यामुळें ते नेहमीच पैशाच्या अडचणीत असत व त्यांचें सर्व जीवन गरीबीतच गेलें. गरीबीशीं झगडतांना त्यांना जीवनांत जरी फार कष्ट सहन करावे लागले तरी गरीबी त्यांच्या ध्येयवादी जीवनांत केव्हांहि अडथळा बनूं शकली नाही. सर्व युगप्रवर्तकांप्रमाणें त्यानाहि त्यावेळच्या राष्ट्रवादाच्या कालांत आंतरराष्ट्रीयत्वाच्या ध्येयाचा पुरस्कार करण्यामुळें व त्याचें एक प्रधान साधन म्हणून आपण स्वतः बनविलेली भाषा एस्पेरँटो हिला विश्वभाषा म्हणून मान्यता प्राप्त व्हावी व तिचा तसा प्रसार व्हावा म्हणून तिचा प्रचार करण्यांत फार कष्ट सहन करावे लागले. तरी पण सर्व कष्ट सहन करून सर्व अडथळे पार करून आपल्या जीवनांत ठरवलेलें ध्येय गाठण्यांत ते यशस्वी झालेच. सुरुवातीस एस्पेरँटो म्हणजे जो एक चेष्टेचा विषय झाला होता त्याच एस्पेरँटोचा शेवटी सामान्य जनापासून विद्वानांपर्यंत व दैनंदिन व्यवहारापासून विद्वानांच्या बड्या बड्या सभा--अधिवेशनापर्यंत सर्व युरोपभर प्रसार व उपयोग आपल्या जीवनांतच आपल्या डोळयादेखत त्यानी पाहिला; व इंग्लंड, फ्रान्स आदि देशांच्या सरकारांकडून व तेथील विद्वन्मंडळांकडून एस्पेरँटोच्या त्यांच्या पितृपदाचा गौरव करावा म्हणून त्यांना सन्मानार्थक पदव्या अर्पण केल्या गेल्या. आज ते जगात एक महान् विश्वपुरुष म्हणून मानले जातात. आज जगांत एक परमोच्च सांस्कृतिक संस्था म्हणून मानली जाणारी यूनेस्को (U. N. E. S. C. O.) या जागतिक संस्थेनें ज्या सहा विश्वपुरुषांची








जन्मशताब्दि स्वतः साजरी करण्याचा १९६० साली निर्णय घेतला होता व त्याचप्रमाणें आपल्या सदस्य राष्ट्रांनाहि आपापल्या देशांत या सहा विश्व-पुरुषांची जन्मशताब्दि साजरी करावी म्हणून आदेशहि दिला होता, त्या सहा विश्वपुरुषामध्ये एस्पेरँटोचे जनक डॉ. झामेन्होफ्[1] हे एक आहेत. या निर्णयाप्रमाणें यूनेस्कोनें डॉ. झामेन्होफ् यांची जन्मशताब्दि नुकतीच साजरी केली. यूनेस्कोनें आपल्या १९५४ च्या जनरल् असेम्ब्लीच्या ठरावांत[2] सांस्कृतिक क्षेत्रांत आंतरराष्ट्रीय विचारविनिमयार्थ एस्पेरँटोचें महत्त्व मान्य केलें आहे व हेंहि मान्य केलें आहे कीं जागतिक एस्पेरँटो आंदोलनाचें ध्येय व आपलें ध्येय यांच्यांत अगदी एकवाक्यता असून ते परस्परपूरक आहेत.

एस्पेरँटोचा उपयोग आज सत्तारावर वर्षें झालीं सतत होत आला आहे. आपल्या जीवनाच्या इतक्या प्रदीर्घ इतिहासांत दैनंदिन संभाषण, पत्र-व्यवहार, वृत्तपत्रव्यवसाय, नाटक, सिनेमा, रेडिओ, शास्त्र, साहित्य, धर्म-तत्वज्ञान, राजनीति. सभा-अधिवेशन, आंतरराष्ट्रीय राजनैतिक व्यवहार व अन्य संबंध, आंतरराष्ट्रीय प्रवास अशा अनेक क्षेत्रांत एस्पेरँटोनें आपली योग्यता दाखवून दिली आहे. आजपर्यंत एस्पेरँटोमध्यें कांहीं कमी आहे असें कोणासहि भासलें नाहीं. विचाराभिव्यक्ति, भावनाविष्कार, अथवा ओघवत्ता याबाबत एस्पेरँटो लिहिणा-बोलणाऱ्यांना कधीहि अडचण भासली नाहीं. असें असूनहि ही विश्वभाषा इतर राष्ट्रीय भाषांशी तुलना केली असतां शिकण्यास अत्यंत सोपी आहे. पण या विश्वभाषेचा हा सोपेपणा

---

१. डॉ. झामेन्होफ्च्या विस्तृत चरित्राबद्दल पहा :—

Prof. R. B. Joshi :– Zamenhof– Discoverer of Esperanto, Sunday Times (20-12-1959), Madras.

Prof. R. B. Joshi :– Le Centenaire de dr. L. L. Zamenhof, La Voix Nowvelle (10 Nov. 1959), Pondicherry.

Prof. E. Privat :– Vivo de Zamenhof.

2. " The General Conference, having discussed the report of the Director General on the International Petition in favour of Esperanto,

(i) takes note of the results attained by Esperanto in the field of international intellectual relations and in the reapproachment of the peoples of the world;

(ii) recognises that these results correspond with the aims and ideals of U. N. E. S. C. O.;

(iii) authorises the Director General to follow current development in the use of Esperanto in education, science, and culture, and, to this end, to co-operate with the Universal Esperanto Association in matters concerning both organisations;

(iv) takes note that several Member states have announced their readiness to introduce or expand the teaching of Esperanto in their schools and higher educational establishments, and requests these Member states to keep the Director General informed of the results attained " [ U. N. E. S. C. O. ( 1954– Montevideo ) General Conference Resolutions : II. 1. 4. 421–24. ]

म्हणजे तिच्या बालिशतेची खूणच असें मात्र समजूं नये. या सोपेपणाचें कारण म्हणजे या भाषेची बालिशता नव्हे; तर या सोपेपणाचें कारण म्हणजे या भाषेची तर्कशुद्धता व नियमबद्धता आहे हें समजलें पाहिजे. सर्व राष्ट्रीय भाषा प्राकृतिक (natural) असल्यामुळें निसर्गक्रमानुसार आपोआप अशा विकास पावत आल्या आहेत कीं त्यांच्यात नियमबद्ध व अनियमित, आवश्यक व अनवश्यक ( redundant ), नियमप्रचुर व अपवादप्रचुर या सर्वांचें एक संकीर्ण मिश्रण असलेलें आपणास नेहमी दिसून येतें. पण एस्पेरँटो अप्राकृतिक म्हणजे बनविलेली अथवा रचित असल्यामुळें तिचा असा विकास होत आला आहे कीं प्राकृतिक विकासाचे सर्व फायदे मिळूनहि पुनः ती तर्कशुद्ध राहूं शकली, अपवादरहित आणि अनवश्यकरहित राहूं शकली. पण हेंहि समजलें पाहिजे कीं ही भाषा ज्याला एखादी युरोपियन् भाषा येते त्याला फार सोपी आहे, कारण ही भाषा अशी बनविली गेली आहे कीं हिचा शब्दसंग्रह युरोपियन् भाषांच्या प्रधान गटांतील प्रधान भाषांतून शब्द घेऊन तौलनिक अभ्यास करून उच्चारणसौकर्यावर दृष्टि ठेवून बनविला आहे. पण ज्याला एकहि युरोपियन् भाषा येत नाहीं अशा माणसाबाबत एस्पेरँटोच्या सोपेपणाचा हा अर्थ आहे कीं अन्य युरोपियन् राष्ट्रीय भाषांशीं तुलना केली असतां एस्पेरँटो ही शिकण्यास अत्यंत सोपी आहे. जेव्हां युरोपीयेतरांना एकादी युरोपियन् भाषा व ही विश्वभाषा यापैकीं एक भाषा जगाशी किंवा निदान युरोपशी संबंध राखण्यासाठीं शिकणें आवश्यक वाटेल तेव्हां युरोपीयेतरानी एकाद्या राष्ट्रीय युरोपियन् भाषेच्या ऐवजी ही विश्वभाषा शिकणें जास्त पसंत करावें[४] अशी एस्पेरँटोच्या तर्फे एक सूचना आम्हाला करावीशी वाटते.

आज एस्पेरँटोचा प्रचार व प्रसार युरोप, दक्षिण आणि उत्तर अमेरिका, व कॅनडा या देशांत जास्त आहे. आशियांत केवळ जपानमध्ये व त्याच्या खालोखाल इंडोनेशियामध्ये एस्पेरँटोचा प्रचार व प्रसार जास्त दिसून येतो. युरोपियन् गोष्टी स्वीकारून आत्मसात् करण्यामध्यें जसें अन्य क्षेत्रांत तसेंच या भाषेच्या क्षेत्रांतहि आशियांत सर्व राष्ट्रापेक्षां जपान पुढें आहे. या भाषेच्या जन्मापासूनच या भाषेबद्दल जपानमध्यें आस्था दिसून आली आहे; व आज या भाषेचा प्रसार व प्रचार याबाबत, या भाषेत उच्च दर्जाच्या प्रकाशनाबाबत, व या भाषेवरच्या प्रभुत्वाबाबत[५] जपान कोणत्याहि पाश्चात्य राष्ट्रांशीं तुलना केली असतां मागे नाहीं. आतां अन्य आशियाई देशांमध्यें व आफ्रिकेमध्यें हॉलंड येथील जागतिक एस्पेरँटो आंदोलन केंद्राच्या द्वारा संचालित प्रचार जोरानें सुरुं आहे. याचेंच एक फल म्हणजे १९५८ साली "दक्षिण आशिया एस्पेरँटो फेडरेशन"ची स्थापना हें होय. ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड येथेहि एस्पेरँटोचा प्रसार सध्या खूपच असून दिवसेदिवस जोरानें वाढतच आहे.

आपण वर पाहिलें आहे कीं एस्पेरँटो ही युरोपियन् भाषांमधून जन्मली आहे व तिचा पिंड अजूनहि युरोपियनच आहे व पुढे युरोपियनच राहीलहि. यामुळें आंतर-आशियाई व्यवहार-संबंधांत या भाषेचा उपयोग

३. म्हणून अलीकडे एस्पेरँटिस्टांचा असा आग्रह आहे कीं या भाषेला "कृत्रिम" ( artificial ) भाषा म्हणण्याच्या ऐवजी "शास्त्रीय" ( scientific ) भाषा म्हणणें अधिक उचित आहे; कारण ही भाषा खूप ( तुलनात्मक ) अभ्यास व प्रयोग प्रदीर्घकालपर्यंत करून त्याच्या आधारावर बनविलेली आहे. म्हणून एस्पेरँटिस्टांच्या मतानुसार अन्य राष्ट्रीय भाषा "प्राकृतिक" ( natural ) आहेत तर ही भाषा "शास्त्रीय" ( scientific ) आहे आणि या शास्त्रीय युगामध्यें जशा अन्य "शास्त्रीय" वस्तु स्वीकारल्या गेल्या आहेत तसेंच ही "शास्त्रीय" भाषा देखील स्वीकारली जाण्यामध्यें कांहीं हरकत नसावी.

४. अन्य युरोपियन् राष्ट्रीय भाषा शिकण्यास एस्पेरँटो प्रथम अवगत असल्यास त्याच्या ज्ञानाचें फार साहाय होतें व शिवाय कोणतीहि युरोपियन् भाषा एस्पेरँटोतूनच शिकणें तर फारच सोपें असतें.

५. एस्पेरँटो जरी शिकण्यास सोपी असली तरी एस्पेरँटोचा केवळ बिनचूक उपयोग करण्याची योग्यता असणें व त्या भाषेवर प्रभुत्व असणें यामधील फरक जसा इंग्रजीच्या बाबत दिसून येतो तसाच येथेहि थोडासा दिसून येतो.

करणें कांहीं आशियावासियांना भावनात्मकदृष्ट्या आक्षेपार्ह वाटलें. त्यातून दोन आशियाई "विश्वभाषाचा" हि जन्म झाला. पण या दोन भाषा म्हणजे त्याहि केवळ योजनाच राहिल्या व जन्मानंतर थोड्याच दिवसांत त्यांचा अंतहि झाला. या उदाहरणावरून असें दिसून येतें कीं जपाननें सुरुवातीसच या भाषेचा स्वीकार करून व आज तिला आपलीशीच बनवून टाकून व अशा आशियाई विश्वभाषेच्या निर्मितीच्या भानगडीत न पडतां विश्वभाषेच्या बाबतीत अन्य आशियाई राष्ट्रांना योग्य रस्ता दाखवून दिला आहे. शिवाय असेंहि मानलें कीं एकादी योग्य संपन्न आशियाई विश्वभाषा बनविणें व उपयोगांत आणणें अगदी शक्य आहे, तरीहि युरोपशी संबंध ठेवण्याच्या बाबत तरी एस्पेरँटो शिकावें लागेलच हें विसरतां कामा नये; कारण आज युरोपांत आणि दक्षिण व उत्तर अमेरिकेमध्यें आंतर-युरोपियन् व आंतर-अमेरिकन् व्यवहार-संबंधांत एस्पेरँटोचा उपयोग दिवसेंदिवस वाढत आहे[६].

आणखीन एका गोष्टीचा येथें उल्लेख करावासा वाटतो. फ्रेंच भाषा एक विश्वभाषेप्रमाणेंच आंतरराष्ट्रीय संबंधांत आज बरेच दिवस उपयोगांत आहे. तरी युरोपांतील फ्रेंच भाषीयांनीं खूप मोठ्या प्रमाणावर एस्पेरँटोचा विश्वभाषा म्हणून अंगिकार केला आहे व त्यांचा बिलकुल विरोध नाहीं. पुनः आंग्लभाषीयांच्या बाबतहि तसेंच आहे. आज इंग्लंड व अमेरिका एस्पेरँटोचा प्रचार, प्रसार, व पुरस्कार या बाबत सर्वांत पुढें आहेत. प्रथम तर जागतिक एस्पेरँटो आंदोलनाचें केंद्रच इंग्लंड होतें व या आंदोलनाला आजचें सफल स्वरूप प्राप्त करून देण्यामध्यें जे ध्येयवादी पुरुष त्या केंद्रात स्वार्थत्यागपूर्वक व उत्साहपूर्वक आजपर्यंत प्रयत्न करीत होते व आजहि करीत आहेत ते सर्व आंग्लदेशीय आंग्लभाषीयच होते व आहेत. इंग्लंड व अमेरिका हे देश आंग्लभाषी असूनहि व अमेरिकेला इंग्लिश भाषा आज जगावर विश्वभाषा म्हणून लादण्यासारखी कांहीं अंशी संधी असताहि या आंग्लभाषीयांकडून तसा बिलकुल प्रयत्न होत नाहीं. त्यांचा एस्पेरँटोला बिलकुल विरोध नाहीं. उलट एस्पेरँटोला त्यांचा पूर्ण पाठिंबा आहे. पण एस्पेरँटोचा भारतांत प्रचार व प्रसार करण्याच्या प्रयत्नांत आमच्या असें नजरेस आलें आहे कीं भारतीय आंग्लभाषाभिमानी इंग्रजीलाच विश्वभाषा मानतात व दुसऱ्यानीहि तसेंच मानावें म्हणून आग्रह धरतात व यांचा एस्पेरँटोला अत्यंत कडवा विरोध आहे. इंग्लंड व अमेरिका या

6. (i) At montevideo on the 28th January 1957 the VIth Inter– American Congress of Educators, attended by delegations from all countries of the Western Hemisphere, adopted the following resolution: The VIth Inter–American Congrees of Educators recommends to all high school and elementary School teachers the study of the international language esperanto, because of its great usefulness for international relations."

(American Esperantist).

(ii) And more recently a significant ceremony took place at the Pan–American Union at Washington, D. C. on the 3rd July 1958, when the Secretary General of the Organisation of the American states (O. A. S.), Dr. Jose Antonio Mora, a former ambassador of the Urugnoy to the U. S. A., received a dalegation of the Esperanto Movement, which presented a petition signed by the Presidents of forty-nine Brasilian Organisations, urging the Organisation of the American States (O. A. S.) to consider the merits of the world Inter–Language Esperanto and the possibility of its use in Inter-American Co-Operation. Prominent signatories to the petition included the present Foreign Minister of Brasil Jose Cartos de Macedos Soares.

(American Esperantist).












आंग्लभाषी देशांचें उदाहरण पाहिलें म्हणजे भारतीय आंग्लभाषाभिमान्यांचें उदाहरण आश्चर्यकारक वाटतें.

रशिया, चीन, व अन्य सर्व कम्युनिस्ट राष्ट्रांचाहि या भाषेस फार जोराचा पाठिंबा आहे; आणि चीन व बल्गेरिया हे एस्पेरँटोमधील उच्च दर्जाच्या प्रकाशनाबाबत तर विशेष प्रसिद्ध आहेत. रशिया व अमेरिका यांचा इतर सर्व बाबतीत मतभेद असला तरी या विश्वभाषेच्या बाबतीत संपूर्ण एकमत आहे व दोन्ही राष्ट्रगटांचा सारखाच जोरदार पाठिंबा आहे ही एस्पेरँटोच्या जागतिक स्वरूपाविषयी व जागतिक मान्यतेविषयीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

एस्पेरँटोच्या आजच्या परिस्थितीबाबत कांहीं ठळक गोष्टी येथे नमूद करण्यासारख्या आहेत.[७] आजच जगांतील चौदा देशांतील एकवीस रेडिओ-स्टेशन्‌वरून नियमित एस्पेरँटो ब्राडकास्ट्स् होतात. सन १९६० साली भरलेल्या निरनिराळ्या फक्त एस्पेरँटोचाच उपयोग करणाऱ्या काँग्रेस-कान्फरन्सेसमध्यें दहा हजार प्रतिनिधींनी भाग घेतला होता. एस्पेरँटोमधील ग्रंथसंपत्तीबाबत केवळ ब्रिटिश एस्पेरँटो असोसिएशन्‌च्या लायब्ररीच्या कॅटलागमध्येच सुमारे तीस हजाराची नोंद आहे. आज जगांतील सत्तावीस देशांतील शाळामधून चौदाहजार विद्यार्थी–विद्यार्थिनी एस्पेरँटो शिकत आहेत. इंटरनॅशनल समर युनिव्हर्सिटीत दरसाल निरनिराळ्या देशांतील ख्यातनाम प्राध्यापकांचीं वेगवेगळ्या विषयावर एस्पेरँटोमधून व्याख्यानें होतात. आज बरींच शास्त्रीय नियतकालिकें एस्पेरँटोमधून शास्त्रीय विषयावरील संपूर्ण लेख वा लेखांचे सारांश प्रसिद्ध करूं लागलीं आहेत. शेक्सपियर, मोलियर, डांटे, पुष्किन् वगैरे जगांतील निरनिराळ्या भाषांतील उत्कृष्ट साहित्तिकांच्या पुस्तकांची उत्कृष्ट एस्पेरँटोतील भाषांतरें विपुल आढळतात. जगांतील वेगवेगळ्या भाषातील वाङ्मयाचा परिचय करून घेण्यास एस्पेरँटो हें एक अत्युत्कृष्ट साधन आहे. आंतरराष्ट्रीय मैत्री, आंतरराष्ट्रीय प्रवास, आंतरराष्ट्रीय पत्रव्यवहार, व व्यक्तिगत अथवा व्यापारनिमित्त अथवा कोणत्याहि संस्थेतर्फे अथवा इतर कोणत्याहि कारणासाठीं आंतरराष्ट्रीय संपर्क यासाठीं एस्पेरँटो हें एक अत्यंत उपयुक्त साधन आहे. आज जगांतील कोणत्याहि देशांत एस्पेरँटो जाणणारीं थोडीं तरी माणसें आढळतातच. युनिव्हर्सल-एस्पेरँटो असोसिएशनचे निरनिराळ्या देशांतील अडीच हजार प्रतिनिधी परदेशीय एस्पेरँटिस्टांनां आपल्या हातून शक्य असेल ती हरतऱ्हेची मदत करण्यास नेहमी तयार असतात– विशेषतः परदेशांत प्रवास करीत असतां. शिवाय सर्व जगभर जे एस्पेरँटो सोसायटीज्, क्लब्स्, सर्कल्स्, असोसिएशन्स, व फेडरेशन्स् यांचें एक जाळें पसरलें आहे त्यांचा परदेश-प्रवाश्यांना खूप उपयोग होतो व परदेशांतील प्रवासांत भाषेची अडचण बिलकूल भासत नाहीं. एस्पेरँटोच्या साहाय्यानें कोणत्याहि देशांतील लोकांत आपण दुभाष्याच्या मदतीशिवाय चांगले मिसळूं शकतो व त्यांच्याशी समरस होऊं शकतो. इंग्लंडमध्यें हॅरोगेट येथें १९६१च्या ऑगस्टमध्यें भरणाऱ्या युनिव्हर्सल एस्पेरँटो काँग्रेसमध्यें जगांतील पन्नास देशांतील दोन हजार प्रतिनिधी भाग घेतील. या काँग्रेसच्या बालशाखेच्या अधिवेशनांत बावीस देशांतील बालक एकत्र येऊन एस्पेरँटोमध्येच बोलतील. जागतिक एस्पेरँटो आंदोलनामध्यें बालकांचे, तरुणांचे, स्त्रियांचे असे वेगवेगळे आंतरराष्ट्रीय संघ आहेत व तसेच विषयवार व व्यवसायवार असेहि आंतरराष्ट्रीय संघ आहेत—उदा. एस्पेरँटिस्ट डॉक्टरांचा, शिक्षकांचा, वकीलांचा, रेल्वेनोकरांचा, विद्यार्थ्यांचा, मजुरांचा, स्टँपकलेक्टर्सचा, भूगोलाभ्यासकांचा, धर्माभ्यासकांचा, भाषाभ्यासकांचा, शास्त्रज्ञांचा, पत्रकारांचा इत्यादि असे अनेक संघ आहेत. कोणत्याहि माणसाचा कोणताहि विषय वा व्यवसाय असो त्या विषयाच्या वा व्यवसायाच्या जगातील अन्य देशांतील माणसाशी अशा एस्पेरँटो संघामुळें सत्वर संबंध घडून येणे सुलभ असतें व अशा संपर्काचा फायदा एस्पेरँटोमुळें कोणालाहि घेतां येतो. आज जगाच्या ८२ देशांत ही भाषा चांगल्याच प्रमाणावर उपयोगात असून जगाच्या

७. पुढील माहिती बहुतेक हॅरोगेट येथें १९६१ च्या ऑगस्टमध्यें भरणाऱ्या युनिव्हर्स एस्पेरँटो काँग्रेप्रिपेरेटरी कमिटीच्यां माहिती पत्रकांवर युनिव्हर्सल एस्पेरँटो असोसिएशनूच्या वेळोवेळीं निघणाऱ्या इंटरनॅशनल न्यूज बुलेटिनवर आधारित आहे.











४२ भाषेत ही भाषा शिकण्याकरिता सहायक पुस्तकें उपलब्ध आहेत. या भाषेंत जगांत प्रसिद्ध होणाऱ्या निरनिराळ्या नियतकालिकपत्रांची संख्या आज शंभरावर गेली आहे. निरनिराळ्या विषयांचे पारिभाषिक कोश, आंधळ्यांकरिता ब्राईल वाङ्मय, शॉर्टहॅंड सिस्टीम्स, निरनिराळ्या विषयावरील खास जर्नल्स असें वाङ्मयहि या भाषेंत विपुल आहे. यूनेस्कोच्या १९५४ च्या ठरावापासून युनिव्हर्सल एस्पेरँटो असोसिएशन व यूनेस्को यांचे संबंध दिवसेदिवस जास्त घनिष्ठ होत आहेत. यूनेस्कोच्या पूर्व-पश्चिम सांस्कृतिक संबंधाच्या दशवार्षिक योजनेंत युनिव्हर्सल एस्पेरँटो असोसिएशन् हें अत्यंत हिरीरीनें भाग घेत आहे व यूनेस्कोच्या ध्येयाला अनुरूप अशी स्वतःचीहि स्वतंत्र अशी एक योजना आखली आहे. लिव्हरपूल युनिव्हर्सिटीत एस्पेरँटोची एक चेअर असून एस्पेरँटो भाषा व वाङ्मय हा विषय बी. ए. ला घेता येतो. क्राकोव्ह व झग्रेब या विश्वविद्यालयांतहि एस्पेरँटो हा विश्वविद्यालयीन विषय झाला आहे व ताएगू या विश्वविद्यालयातहि एस्पेरँटो विश्वविद्यालयीन विषय होण्याच्या मार्गावर आहे. कांहीं सरकारांच्या परराष्ट्रखात्यातर्फे निघणाऱ्या प्रकाशनांत एस्पेरँटोचा उपयोग झपाट्यानें वाढत आहे. नाट्यसृष्टि, काव्य, व संगीत यांत एस्पेरँटोनें खूपच प्रगति केलेली आहे व सिनेमासृष्टीतहि पदार्पण केलें आहे. आज एस्पेरँटोमध्यें बऱ्याच डॉक्युमेंटरीज व बरेच छोटे छोटे चित्रपटहि उपलब्ध आहेत व संपूर्ण मोठे चित्रपट लवकरच एस्पेरँटो मधून निघूं लागतील अशींहि चिन्हें दिसत आहेत. आशियाई राष्ट्रांत जपानच प्रथम एस्पेरँटोमधून चित्रपट काढील अशी आशा बाळगण्यास पुरेसा आधार निर्माण होत आहे. सन १९६५ साली युनिव्हर्सल एस्पेरँटो कॉंग्रेस जपानमध्ये भरविण्याविषयी जपानी एस्पेरँटिस्टां कडून आलेलें आमंत्रण मान्य होऊन टोकिओमध्ये १९६५ साली युनिव्हर्सल एस्पेरँटो कॉंग्रेस भरण्याचें निश्चित झालें आहे. आशियाई देशांत भरणारी ही पहिलीच कॉंग्रेस. ज्या आंतरराष्ट्रीय व्यापारी संस्था एस्पेरँटोचा उपयोग करतात. त्यांची नुकतीच एक यादी पुस्तकरूपांत इटालीत प्रसिद्ध झालेली आहे त्यावरून आंतरराष्ट्रीय व्यापारी क्षेत्रांत एस्पेरँटोचा उपयोग खूपच वाढत आहे असें स्पष्ट दिसून येतें. एस्पेरँटोच्या सद्यःस्थितीचा हा आढावा एस्पेरँटोचा जगभर भरपूर प्रसार झाला आहे याचें निदर्शक म्हणून मानतां येणार नाहीं. सर्व जगभर प्रसाराच्या दृष्टीनें झालेला हा सध्याचा प्रसार थोडाच आहे व अजून खूप व्हायला पाहिजे. एस्पेरँटोची विश्वभाषा बनण्याची योग्यता पुरेपूर सिद्ध झाली आहे व तिचा विश्वभाषा म्हणून जगभर प्रसार होण्याचीं आतां भरपूर चिन्हें दिसूं लागलीं आहेत. इतक्याचाच हा आढावा निदर्शक मानला पाहिजे.

सन १६४१ साली कोमेनियस्ने म्हटलें होतें कीं सध्या ज्ञात असलेल्या भाषांपेक्षा एका सोप्या भाषेची सर्वांना एक समान भाषा म्हणून जगाला आज गरज आहे. व्हाल्टेरनें म्हटलें होतें कीं भाषाभिन्नता ही मानवाच्या मार्गातील एक महान् अडचण आहे. मॉंटेस्क्यूनें म्हटलें होतें कीं आंतरराष्ट्रीय संपर्काची इतकी मोठी जरूरी आहे कीं सर्वांना एक समान अशा भाषेची अत्यंत गरज आहे. एस्पेरँटोनें ही उणीव आतां भरून काढली आहे. आचार्य विनोबा भावेनी म्हटलें आहे कीं एस्पेरँटोचे जनक डॉ. झामेन्होफ् यांना मी एक महात्माच समजतों. एक समान भाषा सर्व जगाचें ऐक्य घडवून आणू शकेल ही डॉ. झामेन्होफ् यांची कल्पना किती छान आहे[८]! एस्पेरँटोविषयी टॉलस्टॉयनें म्हटलें आहे कीं एस्पेरँटोच्या अभ्यासांत थोड्याशा श्रमाचें इतकें मोठें फल मिळतें कीं कोणीहि एस्पेरँटो शिकण्याचा प्रयत्न करून पाहाण्याची संधि दवडूं नये.

---

८. आचार्यांना एस्पेरँटो आंदोलनाविषयीं फार सहानुभूति वाटते इतकेच नव्हे तर वेळांत वेळ काढून त्यानी ती भाषा अलीकडे शिकण्याचा प्रयत्न केला आहे.















राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ग्रंथ-परिचय —

**'दी रोड टू प्लासी'** लेखक ( श्री. तपनमोहन चटर्जी, ओरिएन्ट लाँगमनस् कलकत्ता, १९६०, पृष्ठें १५२, किंमत रु. ५-०० ).

'दी रोड टु प्लासी' या नांवाचें एक इंग्रजी पुस्तक श्री. तपनमोहन चॅतर्जी यांनीं इंग्रजींत लिहिलें आहे. पुस्तक आकारानें लहान असलें, तरी गुणांनीं श्रेष्ठ असल्यामुळें, एकदां पुस्तकाच्या वाचनास प्रारंभ केल्यावर, संपूर्ण वाचन झाल्याशिवाय तें खालीं ठेववत नाहीं.

भारतांतील गंगा व तिच्या उपनद्या यांनीं हिमालयांतून गाळ वाहून आणला. त्या गाळाचे योगानें बंगालच्या उपसागराच्या उत्तरेस त्यांनीं त्रिभुजप्रदेश निर्माण करण्यास प्रारंभ केला. या दलदलीच्या प्रदेशांत सरोवरें निर्माण झालीं, सुंदरबन नांवाचा दाट जंगलांचा प्रदेश निर्माण झाला व बंगालमधील खेडीं या प्रदेशांत अगर प्रदेशालगत निर्माण होऊं लागलीं. अशा आरंभावस्थेपासून, लेखकानें इतिहास कथनास प्रारंभ केला असून इ. स. १७५७ मध्यें प्लासीची लढाई इंग्रजांनीं जिंकली; तेथपर्यंतचा सुसंगत इतिहास लेखकानें सांगितला आहे.

युरोपियन व्यापारी अगर युरोपियन चांचे लोक बंगालच्या या प्रदेशांत व्यापाराच्या आणि लुटालुटीच्या उद्देशानें येईपर्यंत या प्रदेशांतील जीवन इतकें संथ आणि शांत होतें कीं त्याला राजनैतिक इतिहासाचें स्वरूप प्राप्त झालें नव्हतें असें सांगून लेखक आरंभींच पोर्तुगीझांच्या बंगालमधील इतिहासाकडे वळला आहे. इ. स. १५७८ मध्यें सम्राट् अकबरानें पोर्तुगीझांस बंगालमध्यें हुगळी येथें वसाहत करण्यास व व्यापार करण्यास परवानगी दिली. तेव्हांपासून इ. स. १६३२ पर्यंतच्या पन्नास वर्षांच्या कालांत त्यांनीं खिश्चन धर्माचा प्रसार कसा केला, पोर्तुगीझ व बंगाली यांची संमिश्र भाषा बंगालमध्यें कशी बोलली जाऊं लागली याचें दिग्दर्शन लेखकानें मोजक्या शब्दांत केलें असून तें परिणामकारक झालें आहे. आजहि अनेक पोर्तुगीझ शब्द बंगाली भाषेंत कायमचें मूळ धरून राहिले असल्याचीं उदाहरणें लेखकानें दिलीं आहेत. भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीझांमुळें हाच भाषिक संमिश्रणाचा प्रकार कसा घडला व मराठी पोर्तुगीझ शब्द कसे वापरले जाऊन स्थान कायम करून राहिले, या विचारावर मन कांहीं काळ रेंगाळत रहातें. पण भाषाशास्त्रावर विचार सांगत रहाणें हें ग्रंथलेखनाचें उद्दिष्ट नसल्यामुळें लेखकानें आपलें तद्विषयक कथन संपविलें आहे.

पोर्तुगीझांप्रमाणेंच डच, फ्रेंच, जर्मन व आर्मीनियन व्यापारी बंगालमध्यें आले व त्यांनींहि व्यापारार्थ वखारी कशा स्थापित केल्या व दलाल नेमून व्यापार कसा केला याचें दिग्दर्शन या पुस्तकांत आलें आहे. विशेषतः, जर्मनांच्या ऑस्टेंड कंपनीच्या व्यापाराची हकीकत सामान्य वाचकांस सर्वस्वी अपरिचित आहे. इ. स १६५२ मध्यें इंग्रजांस हुगळी येथें वखार घालण्यास परवानगी मिळाली. तेथपासून इ. स. १७५७ पर्यंतचा म्हणजे सुमारें शंभर वर्षांचा इतिहास सांगणें हें लेखकाचें ग्रंथलेखनाचें उद्दिष्ट आहे व तें त्यानें अनेक प्रकरणांतून स्पष्ट केलें आहे.

कोणत्याहि देशांत राजकीय सत्तेचें पाठबळ असलें तरच व्यापार भरभराटतो हें सूत्र स्पष्ट आहे. जेथें राजकीय सत्ता व्यापाऱ्यांकडे लोभी दृष्टीनें पहाते, तेथें व्यापारावर अनेक संकटें येतात व व्यापारास प्रतिबंध होतो. बंगालचे नबाब मुसलमान होते. कंपनीकडून कर, देणग्या, नजराणे इत्यादि नांवाखालीं पैसा काढणें हें जोंपर्यंत नबाबांचें व दिल्लीच्या अधिसत्तेचें उद्दिष्ट होतें, तोंवर कंपनीस व्यापार करणें दुरापास्त झालें, हा विचार लेखकानें सुस्पष्ट मांडला आहे.

एवढेंच नव्हे, तर आपल्या व्यापारास संरक्षण असावें म्हणून वखारींस तटबंदी बांधण्याचा व दारूगोळा ठेऊन संरक्षणाची तयारी ठेवण्याचा विचार कंपनीस, आपाततः कसा करावा लागला, व्यापार करवत नाहीं व सोडवत नाहीं, अशी कंपनीची अनेकदां कशी स्थिति झाली, हेंहि लेखकानें सांगून टाकलें आहे. आरंभापासूनच राजकीय सत्तेचें संरक्षण कंपनीस मिळत गेलें असतें, तर तिला आपल्या संरक्षणाची तयारी ठेवावी लागली नसती व तींतून कंपनीला जें राजकीय वर्चस्व निर्माण करण्याचा विचार सुचला, तो सुचला नसता; एवढें सुचविण्यापर्यंत लेखकानें आपले विचार स्पष्ट केले आहेत. प्रजेचें, धर्माचें व अर्थव्यवस्थेचें असें त्रिविध संरक्षण राजसत्तेकडून अपेक्षित असतें. हें जेथें मिळत नाहीं, तेथें








राज्यक्रान्तीचा संभव होतो, हा विचार लेखकानें या पुस्तकाच्या निमित्तानें मांडला आहे.

इंग्रज लोक या देशांत येत, तेव्हां ते अविवाहित असत. येथें येऊन ते लग्नें करीत. मायदेशांत परत जातांना अनेकजण आपल्या बायका घेऊन जात. यामुळें इंग्लिश रक्तांत भारतीय रक्त मिसळल्याचा विचार लेखकानें सांगितला आहे. कांहींजणांना आपल्या बायका बरोबर नेण्याची कशी अडगळ वाटे, हा नाजुक विचारहि लेखकानें हाताळला आहे.

इ. स. १६९० आगस्ट २४ या दिवशीं जॉब कॉरनॅक यानें सुतनुति येथें घांटावर इंग्रजी गलबतें व्यापारासाठीं आणलीं; त्यानें बंगालमध्यें व्यापार वाढविण्याचे प्रयत्न केले. त्यानें व मद्रासचा अधिकारी गोल्डबरो यांनीं वखारीची जागा निवडली व तेथें बांधकामास प्रारंभ केला. किल्ल्याचें बांधकाम करण्यास सभासिंगाचें बंड कारण झालें. किल्ल्यास फोर्ट वुइल्यम असें इंग्लंडमधील राजाचें नांव कंपनीनें दिलें व तेव्हांपासून तें इंग्रजांचें महत्वाचें ठिकाण झालें. इ. स १६९८ मध्यें तें स्थान अपुरें वाटून रॉय चौधरी याजकडून सुतनुति, कालिकत्ता व गोविंदपूर हीं तीन खेडीं १५०० रु. स खरेदी करून इंग्रजांनीं 'कलकत्ता' शहर निर्माण केलें. तेथें इंग्लिश प्रेसिडेंटचें वसतिस्थान बांधलें. अर्काट येथें कंपनी स्वतःचें रुपयाचें नाणें पाडीत असे. तें नाणें अधिकृत चलन म्हणून चालविण्याचा कंपनीनें आरंभापासून प्रयत्न चालविला. पुढें इ. स. १७०० ते १७०७ या काळांत, भावि राजकीय परिस्थितीचा अजमास करून कंपनीनें नवे बुरूज बांधून फोर्ट वुइल्यम भक्कम केला. आपल्या प्रदेशाच्या व्यवस्थेकरितां 'जमीनदार' नेमला. हॉस्पिट्ल व चर्च बांधलें, हिंदी व्यापाऱ्यांस कलकत्त्यांत नबाबाविरुद्ध आश्रय देण्यास सुरुवात केली, इत्यादि हकीकत लेखकानें दुसऱ्या प्रकरणांत सांगितली आहे.

बादशहा फर्रुकशिअर व डॉक्टर हॅमिल्टन यांचा रोगी व वैद्य म्हणून परिचय करून देऊन हॅमिल्टनमुळें मिळालेल्या फर्मानांची हकीकत लेखकानें दिली आहे. त्यावेळचा बंगालचा नबाब मुर्शिदकुलीखान हा इंग्रजांचा द्वेष्टा असल्यामुळें, या फर्मानांना बराच काळ चिटोऱ्याचें स्वरूप कसें प्राप्त झालें, हें लेखकानें स्पष्ट सांगितलें आहे. या फर्मानांस कंपनीच्या दृष्टीनें योग्य स्वरूप इ. स. १७६४ मध्यें बक्सारच्या लढाईमुळें आलें, यांत इंग्रजांचा एक विजय झाला, हें लेखकानें नमूद केलें आहे. या फर्मानांमुळें कंपनी प्रत्यक्षतः बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांची दिवाण झाली. तत्पूर्वी इ. स. १७२४ मध्यें कंपनीनें चार न्यायालयें स्थापन करून हुगळीच्या मॅजिस्ट्रेटच्या न्यायालयीन सत्तेस धक्का दिला. इं. स. १७५८ पासून कलकत्त्याचा मेयर न्यायदान करूं लागला. व इंग्रज बंगालचे साक्षात् मालक झाले.

इ. स. १७४० मध्यें अलिवर्दीखान बंगालचा नबाब झाला; त्याचें वर्णन या ग्रंथांत पृ. ६२ वर आलें आहे. त्याच्या कालांत मराठयांच्या बंगालवर स्वाऱ्या सुरूं झाल्या. या स्वाऱ्यांची हकीकत व भास्करराम कोल्हटकर याच्या वधाची हकीकत पृष्ठ ६३ वर आली आहे. या प्रकरणीं लेखकानें तत्कालीन मराठी सत्ताधाऱ्यांवर अन्याय केला आहे असें आम्हांस वाटतें. लेखकानें या प्रकरणीं लिहितांना इंग्रजी व पर्शियन साधनें पाहिलीं आहेत असें उघड दिसतें. पण मराठी साधनांतून याबाबत कोणता दृष्टिकोन स्पष्ट झाला आहे, याची लेखकास कांहीं कल्पना असण्याची शक्यता दिसत नाहीं. ज्याला 'सत्य' म्हणून म्हणावयाचें, तें पक्षपाती अगर एकपक्षीय कधींच असूं शकत नाहीं. केवळ, बंगालच्या एका लेखकाच्या लेखनावर विश्वसून हा भाग लेखकानें लिहिला असल्याचें दिसतें. अलिवर्दीखानानें बावीस मराठे सरदार व वीस हजार मराठी सैन्य यांचा विश्वासघातानें कसा वध केला, ही गोष्ट लेखकानें सांगितली असून, नंतरच्या कालांत मराठ्यांनीं ओरिसावर ताबा मिळविल्याची माहिती दिली आहे.

पृ. ७८ वर लेखकानें अतिशय महत्त्वाचा मजकूर सांगितला आहे. इ. स. १७५५ मध्यें एक डॅनिश कंपनी श्रीरामपूर येथें व्यापार करूं लागल्याची हकीकत त्यांत आली आहे. अलिवर्दीखानास इंग्रजांचें व्यापारी वर्चस्व नको होतें; म्हणून त्यानें इंग्रजेतर कंपन्यांस व्यापारास परवानगी दिल्याचा उल्लेख अनेक जागीं आला आहे.

या काळांतील इंग्रजांच्या श्रद्धाळू स्वभावाचें दिग्दर्शन करतांना लेखकानें असें सांगितलें आहे कीं इंग्रज

ब्राह्मणांना दक्षिणा देत; काली प्रसन्न व्हावी म्हणून तिला देणग्या धाडीत; विजय प्राप्त व्हावा म्हणून तिला नवस करीत, प्रार्थना करीत. हीं पृ. ७६ वरील वर्णनें वाचीत असतां मनाची करमणूक होते.

पृ. ८० वर अलिवर्दीखानाच्या मृत्यूनंतर सिराज उद्दौला इ. स. १७५६ मध्यें नबाब झाल्याची हकीकत सुरू झाली आहे. येथें पुस्तकाचा उत्तरभाग सुरू होतो. पुढील सुमारें ७० पृष्ठांतून बंगालचा २१३ वर्षांचा राजकीय इतिहास आला आहे. इ. स. १७५६ जून १६ या दिवशीं इंग्रज व सिराज उद्दौला यांची पहिली लढाई चितापूर येथें झाली व तींत इंग्रजांचा विजय झाला! १८ जूनच्या लालदिघीच्या लढाईंत इंग्रजांचा पराजय झाला. इंग्रजांना कलकत्ता सोडून पळून फुल्टा येथें आश्रय घ्यावा लागला; इत्यादि हकीकती देत असतांना लेखकानें कलकत्त्याच्या अंधारकोठडीच्या प्रकारावर प्रकाश टाकला आहे. सदर प्रकरण हॉवेलनें कसें रंगविलें व त्याचा राजकीय भांडवल म्हणून कसा फायदा करून घेतला, हें सांगितल्यावर लेखकानें स्पष्ट सांगितलें आहे कीं या प्रकरणीं सिराजउद्दौला याचा कांहींहि हात अगर अपराध नव्हता. पृ. १०८ ते १५२ वर सिराजउद्दौला विरुद्ध क्लाइव्ह व वॉटसन यांनीं केले त्या युद्धाची व प्लासीच्या लढाईची हकीकत देऊन लेखकानें आपला ग्रंथ पूर्ण केला आहे.

श्री. तपनमोहन चॅतर्जी यांनी इंग्रज कंपनी बंगालची सत्ताधारी कशी झाली याचें साधार विवेचन केलें आहे. पण लेखकानें जागजागीं आपले आधार या पुस्तकांत छापले नसल्यामुळें, पुस्तक अधिकृत असूनहि त्याची योग्यता कमी झाली आहे. लेखकानें आपल्या माहितीचे आधार पदटीपेंत दिले असते, तर त्याचें मोल वाढलें असतें, त्यांचे अभावीं हा चांगला ग्रंथ आधार म्हणून वापरणें अशक्य झालें आहे. इतिहासास जर शास्त्रीय विषय मानावयाचें, तर विवेचनाचे आधार बाजूस ठेऊन कसें चालेल ? आपला ग्रंथ न्यायाधिशाच्या समतोल दृष्टींतून लिहिल्याबद्दल जाणकार वाचक लेखकांस धन्यवाद देतील.

शून्यांतून कलकत्ता शहराची निर्मिती कशी झाली याची ही कथा उद्बोधक आहे, यांत संशय नाहीं.

— शां. वि. आवळसकर

---

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष